# नवभारत

सप्टेंबर २०१२

केन्स यांची उपजत ऊर्मी :
(भारतीय संदर्भात प्रस्तुत किती? अप्रस्तुत किती?)

उपयोजित समीक्षा : स्वरूप व चर्चा

उपाध्ये आम्नाय प्रवर्तक :
ज्ञानतपस्विनी आचार्यश्री कमळाइसा

खासगीकरण, शैक्षणिक शुल्क आणि गुणवत्ता

महापूर आपत्ती व्यवस्थापन :
राष्ट्रीय कार्य आणि कर्तव्य

भारतीय आदिवासींची चरित्रे :
एक विवेचन

डॉ. बाबासाहेब आंबेडकर
यांचे देश-विकासातील योगदान

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई




नोंदणी क्र. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका






# आवाहन

'नवभारत' हे वैचारिक मासिक सुरू होऊन आता ६१ वर्षे झाली. साहजिकच मासिकाच्या मूळ कर्त्यांनी जे उद्देश डोळ्यांपुढे ठेवले होते, ते उद्देश स्वीकारून लिहिणारे लेखक व त्या उद्देशांविषयी आस्था बाळगणारे वाचक आता कमी होत चालले आहेत. तरीदेखील वैचारिक आदानप्रदानाचे समर्थ व्यासपीठ म्हणूनच 'नवभारता' ने कार्य करीत राहावे, असाच आमचा संकल्प आहे.

भारतीय परंपरेची ओळख व परिष्करण करून देणारे लेख येतच राहतील. परंतु, विज्ञान, अर्थकारण, तत्त्वज्ञानातील आधुनिक विचारप्रवाह, इतिहासलेखनाला आलेले नवे रूप इत्यादी विषयांची भाष्यरूपाने ओळख करून देणे, नवीन ग्रंथांची समीक्षा करणे, लोकसाहित्य, दलित वाङ्मय यांना जी काळानुरूप वळणे मिळत आहेत त्यांचा मागोवा ठेवणे या विषयांवर भर देणे अगत्याचे झाले आहे. लघुकथा, ललित लेख व कविता या 'नवभारता'ने पूर्वीही कक्षेबाहेर ठेवल्या नव्हत्या व आताही त्या कक्षेबाहेर ठेवलेल्या नाहीत.

आज तालुक्याच्या ठिकाणी महाविद्यालये निघाली आहेत. येथील शिक्षण मराठी भाषेतून चालते व ते योग्यच आहे. तथापि, इंग्रजी वा अन्य भारतीय भाषांतील विचारप्रवाहांशी या शिक्षणाचा संबंध राहू नये, ही खेदाची गोष्ट आहे. या महाविद्यालयांतील ग्रंथालयात अद्ययावत पुस्तके येत नाहीत व आली तरी ती वाचून सकस चर्चा करतील, असे अभ्यासूंचे गटही सहसा असत नाहीत. आमचे अनेक विद्यार्थी या महाविद्यालयांतून प्राध्यापक व प्राचार्य आहेत. त्यांनी ही व्यथा आमच्यापाशी बोलून दाखविली व असेही सांगितले की, 'नवभारता'तील काही लेखांच्या छायांकित प्रती काढून त्यांनी विद्यार्थ्यांना आवर्जून वाटल्या.

आमची अशी खात्री आहे की, महाविद्यालये, तेथील प्राध्यापक व विद्यार्थी तसेच गावोगावी विखुरलेले अभ्यासू नागरिक यांना 'नवभारत' वाचण्याची व त्यातील लेखांवर चर्चा करण्याची सवय लागून जाईल. या सर्वांनी आपले दर्जेदार लेख 'नवभारत' कडे अवश्य पाठवावेत.

यासाठी 'नवभारता'चा प्रसार झाला पाहिजे. आमची वाचकांना अशी विनंती आहे की, त्यांनी 'नवभारता'ला वर्गणीदार मिळवून देण्याची मोहीम चालवावी. जो वाचक पाच वर्गणीदार मिळवून देईल, त्याने सहाव्या व्यक्तीचे नाव व पत्ता कळवावा. त्या सहाव्या व्यक्तीला 'नवभारता' चे अंक वर्षभर आमच्याकडून विनाशुल्क पाठवले जातील. वर्गणीदार कोणत्याही महिन्यापासून होता येते.

वर्षाची वर्गणी रु. ३००/- असून वर्गणी, चेक/डी.डी./मनिऑर्डर यांच्याद्वारे 'नवभारता'च्या पत्त्यावर पाठवावी. चेक/डी.डी. 'नवभारत' मासिक, या नावाने ३१५, गंगापुरी, वाई ४१२८०३ या पत्त्यावर पाठवावे.

**– संपादक मंडळ**

अनुक्रमणिका








वर्ष ६५। अंक १२। सप्टेंबर २०१२
अधिक/निज भाद्रपद शके १९३४
वार्षिक वर्गणी ३०० रुपये
या अंकाची किंमत रु. २०/-

प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत



## नवभारतची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक-मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोणानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा, या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील, अशी काळजी घेतली जाईल.

*नवभारत, ऑक्टोबर १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै. शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.



संपादकीय पत्रव्यवहार :
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).
फोन : (०२०) २५६७४०९३.

व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :
घ. वा. जोशी
व्यवस्थापक, नवभारत मासिक
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५, गंगापुरी,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा)
फोन : (०२१६७) २२०००६.





राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

# नवभारत

## सप्टेंबर २०१२

## अनुक्रमणिका

# केन्स यांची उपजत ऊर्मी :
# (भारतीय संदर्भात प्रस्तुत किती? अप्रस्तुत किती?)

श्री. शि. ना. मांने

**प्रास्ताविक :-**

अर्थशास्त्र हे एक प्रवाही शास्त्र आहे. १७७६ ते २०१२ या काळातील त्याची वाटचाल हा त्याचा पुरेसा पुरावा आहे. दुसऱ्या शब्दांत, अर्थशास्त्रांत सार्वत्रिक स्थिर (Universal constant) असे काही नसते. विश्वविख्यात अर्थशास्त्रज्ञ जे. एम. केन्स यांनी मांडलेली मनुष्यप्राण्यांची पुनरुज्जीवनाची उपजत, नैसर्गिक आणि तर्कविसंगत ऊर्मी किंवा चेतना (Animal spirits) त्या सार्वत्रिक स्थिर नियमाला अपवाद नाही. विशेषतः २८ जून २०१२ रोजी पंतप्रधानांनी वित्तखात्याचा कार्यभार स्वतःकडे ठेवण्याचा निर्णय जाहीर केल्यानंतर त्या संज्ञेच्या परिचलनाचा वेग परत एकदा वाढला.

केन्स यांनी १९२९-३१ मधील मंदीच्या पार्श्वभूमीवर या संज्ञेची मांडणी केली. भारतातील सध्याच्या आर्थिक अपसरणात (Recession) चाचपडणाऱ्या अर्थ-व्यवस्थेच्या संबंधात पंतप्रधानांनी त्या संज्ञेचा पुनरुच्चार केला. विशेषतः विविध सरकारी प्रोत्साहने व उत्तेजने यांना योग्य प्रतिसाद न देणाऱ्या (Zombie) व आर्थिक आतबट्ट्याच्या (Deducting losses) उंबरठ्यावरील उद्योगक्षेत्रांत विश्वास व उत्प्रेरणा निर्माण व्हावी, हा पंतप्रधानांचा प्रामाणिक हेतू होता. आज केन्स यांनी त्या संज्ञेची मांडणी केल्यानंतर ७५ वर्षे उलटून गेली आहेत. २०१२ मध्ये ती संज्ञा किती प्रस्तुत (Relevant) व किती अप्रस्तुत आहे, या प्रश्नांची उत्तरे शोधणे अप्रस्तुत ठरू नये. विशेषतः व्यवसायाच्या 'जोखीम व्यवस्थापन शास्त्रा'च्या संदर्भात ती संज्ञा तर्कविसंगत व अबोध वाटते. परंतु आश्चर्याची गोष्ट अशी, की काही प्रथितयश सरकारी अर्थशास्त्रज्ञांनी पंतप्रधानांच्या विधानाला उचलून धरण्याच्या घाईत केन्स यांच्या असयुक्तिक संज्ञेच्या अतिसरलीकरणाचा (Oversimplification) दोष मात्र ओढवून घेतला. खरेतर, पुष्कळदा पशूप्रमाणे मनुष्यप्राण्याच्या नैसर्गिक ऊर्मीचे उन्मादात किंवा फ्रॉइडप्रणीत अबोध मनात (Perception of mind without reasoning) कधी रूपांतरण होईल, याचे भविष्यकथन आज करता येत नाही; परंतु इतिहासात त्याची अनेक उदाहरणे सापडतात. नमुना म्हणून त्यांचा यथावकाश उल्लेख करण्यापूर्वी केन्स यांच्या संज्ञेचा त्यांच्या शब्दांत अर्थ पाहू आणि तिचे स्पष्टीकरण करू.

**अर्थ व स्पष्टीकरण :-**

"…. आपल्या सकारात्मक व्यवहारांचा अधिकतर हिस्सा गणितीय अपेक्षेपेक्षा उत्स्फूर्त आशावादावर अवलंबून असतो. जास्तीत जास्त शक्यता अशी, की आपले निर्णय (मनुष्य) प्राण्यांच्या तर्कविसंगत (अबोध) चेतनांचा परिणाम म्हणून घेतले जातात; अक्रियेपेक्षा आणि संख्यात्मक लाभांच्या भारांकित सरासरीचा परिणाम म्हणून नव्हे."[१] पुढे लगेच सावध करताना ते म्हणतात, की "नैसर्गिक क्रियांऐवजी आपण जर गणितीय आकडेमोडीवर अवलंबून राहिलो, तर मनुष्यप्राण्यांची साहस करण्याची उपक्रम-शीलता (Enterprise) मावळेल व मरून जाईल."[२]

याच्या पुढे जाऊन आर्थिक व्यवहारात व विशेषतः मंदीनंतरच्या काळात मनुष्यप्राण्याच्या उपजत ऊर्मीचे समर्थन करताना ते म्हणतात, की "मनुष्यप्राण्यांचे निर्णय काटेकोर गणितीय आकडेमोडीवर अवलंबून असण्याचा प्रश्नच निर्माण होत नाही; कारण, अशा आकडेमोडीसाठी आधारच अस्तित्वात नव्हता."[३] परंतु त्या वेळी तो आधार अस्तित्वात नव्हता हे मान्य केले, तरी आज तो अस्तित्वात आहे, याकडे दुर्लक्ष करता येत नाही. मागील ७५ वर्षांत अर्थमिती (Econometrics), धोरणशास्त्र (Policy science), विमागणिती (Actuary), इंटरनेट, न्याय-वैद्यकशास्त्र, जोखीम व्यवस्थापन (Risk management), संगणित्रचलित समस्या अन्वेषण पद्धती (Algorithm) व मानवरूपी वर्तनविषयक अर्थशास्त्र यांच्या पुलाखालून बरेच पाणी वाहून गेले आहे. त्याविषयी पुढे योग्य ठिकाणी विचार करू. त्यापूर्वी

अनुक्रमणिका

मागे उल्लेख केलेल्या व पुढे यथावकाश विचार करावयाच्या गोष्टीकडे परत वळू.

आपणास माहीत आहे, की मनुष्यप्राण्याच्या उपजत ऊर्मीचे कधीतरी उन्मादात रूपांतरण होऊ शकते. वैयक्तिक जीवनात व संपूर्ण समाजात गोंधळाची परिस्थिती निर्माण होते. इतिहासात त्याचे अनेक दाखले सापडतात. पुढील चार नमुन्यांचा संक्षेपात उल्लेख करू. हेतू हा, की केन्स यांच्या संज्ञेचे जास्त स्पष्टीकरण होईल.

**अ) मुगाबे यांचे झिंबाब्वे प्रतिमान :-** लोकांसाठी उत्पादनपरिव्ययापेक्षा अल्प किंमतींना वस्तू उपलब्ध करणे, दोन्हींतील फरकापोटी उत्पादकांना अर्थसाहाय्य नाकारणे, हा राज्याचा/सरकारचा जन्मसिद्ध हक्क आहे. बाजाराला त्यात हस्तक्षेप करण्याचा अधिकार नाही. परिणाम? वस्तू गायब. २००२ मधील १४४ टक्के किंमत निर्देशांक २००८ मध्ये ५०,००० टक्के झाला. वस्तूच भूमिगत झाल्या. निर्देशांकाचे मापन करणे अवघड झाले. ५,००,००० झिंबाब्वे डॉलरच्या नव्या नोटा चलनात आणल्या. ५,००,००० झिं. डॉ. मूल्याच्या नोटेला १ किलो साखर मिळण्याची मारामार झाली. मात्र काळ्या बाजारात ५,००,००० डॉ. पेक्षा जास्त किंमत मोजून १ किलो साखर उपलब्ध होती. मुगाबे यांच्या तथाकथित उपजत, तर्कविसंगत ऊर्मीचे उन्मादात रूपांतरण झाल्यामुळे हे सर्व महाभारत घडले.

**ब) रूमानियाचा माथेफिरू साम्यवादी हुकूमशहा निकोल चॉस्येक्यु (१९६६–८९) :-** 'गर्भाशय ही राष्ट्राची मालमत्ता आहे', या मस्तीत राहणारा, ब्रह्मचर्य कर (Celibacy tax) लावणारा, गर्भपातविरोधी कायदा करणारा, रूमानिया समर्थ करण्यासाठी लोकसंख्यावाढ अतिवेगवान करणारा व त्याचा परिणाम म्हणून लाखो तरुणांना बेकार व गुन्हेगारांच्या गोळीची शिकार करणारा सत्तापिपासू.

**क) होली रोमन एम्पायर व कुंठित अर्थव्यवस्था (२७ बी. सी. ते ८०६ अे. डी.) :-** ते होली नव्हते, एम्पायर नव्हते व रोमनही नव्हते. ते एक मृगजळ होते. विधिमान्य अराजक होते. लष्करी मोहिमा, राज्यसत्ता व धर्मसत्ता यांच्यातील सतत संघर्ष व यादवी यांनी झपाटल्यामुळे कुंठित अर्थव्यवस्था ही नित्याची बाब. पी. अे. सॅम्युअलसन उपरोधाने म्हणतात त्याप्रमाणे ते असंतुलित अर्थसंकल्पांमुळे किंवा निगरगट्ट नोकरशाहीमुळे कोसळले नाही. सतत लष्करी मोहिमांवरील सैनिक पुरेशा अन्नपुरवठ्याच्या अभावी लढत लढत मेले. ('दे डाइड विथ देअर बूट्स ऑन.') कुंठित अर्थव्यवस्थेमुळे सैन्याची उपासमार हे त्याच्या अस्ताचे खरे कारण होते. हा एक प्रकारचा अबोध मनाचा नाठाळपणा नव्हे काय?

**ड) असहाय मध्यवर्ती बँकव्यवस्था :-** असे म्हणतात, की विश्वात कालगणनेच्या आरंभापासून एका बाजूला तीन क्रांतिकारक शोध लागले – अग्नी, चाक व मध्यवर्ती बँक; तर दुसरीकडे अमेरिकेच्या फेडरल रिझर्वला २००६–०८ मध्ये डोळ्यांवर पट्टी बांधून 'हबल, बबल अँड अॅसेट-प्राइस ट्रबल' संकट स्वस्थ बसून पहावे लागले! कोणी एक दुसऱ्या कोणाकडून संमोहित झाला. निदान तेवढ्या काळात तर्कसंगत वर्तन निलंबित झाले. परंतु व्यापारी, बँकर व राजकारणी यांनी डॉट-कॉम बबलमध्ये रग्गड कमाई केली. हे सर्व फेडरल रिझर्वच्या दुबळेपणामुळे घडले. असो. ही विशाल प्रमाणावरील 'मास हिस्टेरिया'ची चाहूल तर नव्हे?

या चार दाखल्यांमधून पुढील निष्कर्ष येतो– मनुष्यप्राण्याचे ताबडतोबीचे उपजत आकलन जोखीम हाताळण्याचे चांगले मार्गदर्शक होऊ शकत नाही. मनुष्यप्राणी जोखमीचा कधी अतिरिक्त तर कधी न्यून अंदाज बांधतो. म्हणून जोखमीच्या संबंधात ताबडतोबीच्या आकलनाला एखादा चांगला पर्याय का असू नये? या प्रश्नाला निश्चितच उत्तर आहे. ते म्हणजे १९५० ते १९७० च्या दरम्यान उदय झालेले 'धोरण शास्त्र' (Policy science). या धोरण-शास्त्राचा जन्मच मुळात जोखीम हाताळण्यातील मानवरूप घटकींवयवाला कायमची रजा देण्याच्या हेतूने झाला. आणि आता त्याचीच चर्चा करू.

**केन्सोत्तर विश्व :-**

मंदीवरील स्वतःच्या स्वतंत्र भाष्याची नाममुद्रा कोरणारे महान अर्थशास्त्रज्ञ जे. एम. केन्स यांनी १९४६ मध्ये जगाचा निरोप घेतला. त्यांच्यानंतरचे आर्थिक जग अनेक नवे शोध व नव्या समस्यांनी भरले आहे. आपण येथे मनुष्यप्राण्याच्या केन्सप्रणीत उपजत ऊर्मीचा एक चांगला पर्याय म्हणून, नवीन धोरण-शास्त्र व वर्तनविषयक








अर्थशास्त्र यांच्यावर लक्ष केंद्रित करणार आहोत. प्रथम धोरण-शास्त्राविषयी दोन शब्द.

फळयावरील आर्थिक सिद्धान्ताकडून वस्तुनिष्ठ आर्थिक धोरणाकडील संक्रमण हा धोरण-शास्त्राचा पाया आहे. सद्यःस्थितीत भारतात 'स्टॉप प्लॅनिंग अँड स्टार्ट टेकिंग डिसिजन' असे इशारे वारंवार कानावर पडत आहेत. केवळ महाकाय योजना आखणे पुरेसे नाही.

धोरण-शास्त्र म्हणजे शास्त्रीयतेच्या कसोटीला उतरणारे धोरण देणारे शास्त्र. आणि शास्त्र म्हणजे भौतिक व नैसर्गिक विश्वातील घटितांचा निरीक्षण व प्रयोग यांच्या आधाराने केलेला पद्धतशीर अभ्यास. तो अभ्यास वस्तुनिष्ठ म्हणजे कोणाच्या वैयक्तिक मताने प्रभावित होता कामा नये. उदाहरणार्थ, मागील दोन-तीन वर्षांत गाजत असलेला भारतातील टु-जी ध्वनिलहरी घोटाळा. या घोटाळ्याचे मूळ कारण म्हणजे, बाजारभावापेक्षा अल्प दराने ध्वनिलहरींची करण्यात आलेली विक्री. जी विक्री धोरण--शास्त्रापेक्षा वैयक्तिक मनमानीने प्रभावित होती. त्यामुळे सरकारला मोठी खोट सहन करावी लागली. म्हणूनच एखादा कारखाना उभारावयाचा काय, त्यापासून किती रोजगारनिर्मिती होईल, उत्पादित वस्तूंसाठी बाजारपेठ उपलब्ध आहे काय, प्रदूषणात किती भर पडेल, त्याचे नियंत्रण कसे करावयाचे इत्यादी अंदाज करण्यासाठी व त्यानुसार निर्णय करण्यासाठी संगणित्र व गणितीय प्रतिमानांवर विसंबून राहणे श्रेयस्कर असते. 'निर्णयशास्त्र' या पर्यायी नावाने ते ओळखले जाते.

आता वर्तनाविषयक अर्थशास्त्राविषयी. "आज आपण जे आहोत ते का आहोत?" हा प्रश्न डार्विन यांनी १६० वर्षांपूर्वी विचारला होता. त्यांच्या प्रश्नाचा आज येथे उल्लेख करण्याचे विशेष कारण आहे. ते म्हणजे आजच्या नव्या वर्तनविषयक अर्थशास्त्राचे मूळ डार्विन यांच्या प्रश्नात आहे. आज याच आशयाचा प्रश्न विचारताना स्टीव्हन लेविट (२००५, २००९) म्हणतात : "व्यक्तीला हवी असलेली वस्तू ती का व कशी मिळविते?" विषम ज्ञान, क्षमता व माहितीच्या खट्याळ, मिस्कील, तिरकस व विक्षिप्त (Freakonomics) व्यवहाराच्या आर्थिक जगतात एकाने दुसऱ्याला ठकविणे, लुबाडणे, हा प्रत्येक व्यक्तीचा स्वभाव आहे. जसा खारटपणा हा मिठाचा स्वभाव आहे. *असममिती माहिती (Asymmetric information)* च्या अर्थशास्त्रात, म्हणजे आर्थिक व्यवहारात, आदानप्रदानात भाग घेणारा एक पक्ष दुसऱ्या पक्षापेक्षा जास्त जाणकार असतो. अशा व्यवहारांचा अभ्यास म्हणजे वर्तनविषयक अर्थशास्त्र होय.

त्या नवीन अर्थशास्त्राच्या उदयासाठी ज्यांनी विशेष योगदान दिले, त्यांत जेम्स मिर्लीस व विल्यम विक्रे (१९९६), डॅनिअल काहनेमन (२००२) व लिओनिद हर्विक्झ (२००७) या नोबेलविजेत्यांचा उल्लेख करू. मिर्लीस यांनी वाजवी विमा बाजार, रास्त व्यवहारां-विषयी [५] (समान विनिमय) संशोधन केले. विक्रे यांची सत्य प्रकट करण्यासाठीची सर्वोत्तम मोहोरबंद लिलाव पद्धती [६] प्रसिद्ध आहे. मागील परिच्छेदात धोरण-शास्त्राच्या संदर्भात भारतातील टु-जी ध्वनिलहरी घोटाळ्याचा उल्लेख केला. विक्रे यांच्या मोहोरबंद लिलाव पद्धतीचा वापर टाळल्यामुळे घोटाळा घडला. काहनेमन यांनी काही बँकांची कामगिरी दुसऱ्या बँकांपेक्षा का चांगली असते आणि रोखेबाजारात उतरताना काही ग्राहक कंपनीच्या संभवनीय यशाच्या आशावादापेक्षा तिच्या संभवनीय अपयशाच्या भीतीने ग्रस्त का असतात, [७] या प्रश्नांची उत्तरे शोधली. लिओनिद हर्विक्झ यांनी 'यंत्ररचना संकल्पना सिद्धान्त (१९७२)' (Mechanics Design Theory) मांडला. 'प्रोत्साहनपर सुसंगती' (Incentive Compatibility) ही या सिद्धान्तातील कळीची संकल्पना आहे. प्रत्येक आर्थिक विनिमयाचा परिव्यय किमान पातळीवर कसा ठेवायचा, त्या व्यवहारात सहभागी अनेक अभिकर्त्यांनी सत्य प्रकट करण्यासाठी त्याला कोणती प्रोत्साहने द्यावयाची, या प्रश्नांचा हा सिद्धान्त उहापोह करतो, आणि हे सर्व यथासांग पार पाडताना कोणत्याही एका सहभागी अभिकर्त्याच्या आर्थिक परिस्थितीत घट होता कामा नये [८] (Win-win situation), अशी काळजी कशी घ्यावयाची ते सांगतो.

मिल्टन फ्रीडमन एका ठिकाणी सावधानतेचा इशारा देतात की, कोणत्याही प्रतिमानाचे यश ते 'जमिनीवर' म्हणजे प्रत्यक्षात कसे काम करते, यावर अवलंबून असते. फ्रीडमन यांच्या विधानाचा येथे उल्लेख करण्याचे एक कारण आहे. वरील प्रतिमाने अस्तित्वात असूनही

२००८ मध्ये लेहमन ब्रदर्ससारखी मोठी बँक दिवाळ्यात गेली. अर्थात, कोणत्याही प्रतिमानाची जशी उपयोगाची बाजू असते, तशी दुरुपयोगाचीसुद्धा बाजू असते. 'दी युजेस अँड अॅब्युजेस ऑफ मॅथेमॅटिकल मॉडेल्स' [१] याविषयी चिकित्सा करताना मॅथ्यू व्हॅलेन्शिया म्हणतात, की क्वचित् प्रसंगी वित्तीय जोखमीला जागतिक आर्थिक व्यवस्था दाद देत नाही. अशा पेचात वित्तीय जोखीम डळमळीत झाली, म्हणून त्या वित्तीय जोखमीकडे अंगुलिनिर्देश करण्याऐवजी तिच्या व्यवस्थापनात (प्रतिमानात) योग्य सुधारणा करणे श्रेयस्कर असते. हाच वर्तनविषयी अर्थशास्त्रज्ञांच्या वरील प्रतिमानांचा संदेश आहे.

**गुंतवणूक पश्चायन (Hysteresis) :-**

अपसरण व केन्स यांची उपजत ऊर्मीची/चेतनेची संकल्पना यांच्यातील आंतरक्रियाशीलता (Interactivity), पंतप्रधानांचा त्या आंतरक्रियाशीलतेविषयीचा आशावादी दृष्टिकोन, काही सरकारी अर्थशास्त्रज्ञांची केन्स यांच्या संकल्पनेच्या अतिसरलीकरणाची घाई, व्यवसायातील जोखीमहाताळणीत त्या संकल्पनेच्या प्रस्तुततेविषयी निर्माण होणारा प्रश्न आणि केन्सोत्तर विश्वातील नवे धोरण-शास्त्र व नवे वर्तनविषयक अर्थशास्त्र यांनी त्या संकल्पनेला दिलेला पर्याय या निर्णायक वळणावर आपली चर्चा पोचली आहे. आता समारोपाच्या परिच्छेदांत गुंतवणूक पश्चायनविषयी (Lag) व्यापार-चक्र तज्ज्ञांचे मत पाहू.

उत्प्रेरित कारण (Induced cause) व उत्प्रेरित परिणाम (Induced effect) या भौतिकीतील दोन घटितांमधील अटळ तफावत दर्शविणारे एक चल म्हणजे पश्चायन होय. भौतिकीतील या तफावत दर्शविणाऱ्या चलाचे गुंतवणुकीच्या संबंधात उपयोजन म्हणजे गुंतवणूक पश्चायन. आपण जाणतो, की व्यापारचक्र हे अवकाळी पावसासारखे घटित नाही. त्याच्या पुढील नियमित प्रावस्था (Phases) असतात - घबराट (Panic), अपसरण (Recession), न्यूनतम पातळी/तळ नव्हे (Trough), पुनरुज्जीवन (Revival) व अखेरीस समृद्धी (Prosperity).

भारतातील आजच्या अपसरणाची न्यूनतम पातळीवरील चाल रोखण्यासाठी व देशी-विदेशी गुंतवणूकदारांत विश्वास व आशावाद (Optimism) निर्माण करण्यासाठी सरकारची भिस्त उपजत ऊर्मीवर आहे. त्याचबरोबर सरकारकडे निश्चित राजकोषीय प्रोत्साहने आहेत; परंतु त्यांना अपेक्षित प्रतिसाद मिळत नाही. कारण? या प्रश्नाचे उत्तर आहे गुंतवणूक पश्चायनात. कापड-उद्योगातील अपसरणाची सुरुवात कापड-उत्पादनासाठी आवश्यक यंत्रोत्पादन-उद्योगातील अपसरणात होते, असा एक सर्वसाधारण समज रूढ झाला. परंतु हा रूढ समज आज पुरेसा नाही. विशेषतः भारतीय अर्थव्यवस्थेच्या संदर्भात या समजाला पुढील पुरवणी जोडण्याची गरज निर्माण होते– परिव्यय-प्रभावी (Cost-effective) नवप्रवर्तन व कौशल्यनिर्मिती या गोष्टी गुंतवणूकदारांचा विश्वास व आशावाद वाढविण्यासाठी अल्प व्याजदरापेक्षा महत्त्वाच्या ठरतात. आज आपण सर्वाधिक काथ्याकूट करतो गुंतवणूकदारांच्या विश्वासाविषयी. कृतीत सर्वाधिक भिस्त ठेवतो अल्प व्याजदरावर, की ज्याचा एकूण गुंतवणूक परिव्ययातील हिस्सा कमीत कमी म्हणजे ३ टक्क्यांच्या आसपास असतो. आणि कळीचा प्रश्न असलेल्या कामगार कायदे सुधारणा म्हणजे आपणाला 'आंबट द्राक्षे' वाटतात.

**समारोप :-**

आता आपण आपल्या उदाहरणातील कापड-उद्योगाकडे परत वळू. कापड-उत्पादनात अपसरणविरोधी राजकोषीय गुंतवणूक प्रोत्साहने चालू ठेवली, तर सुरुवातीला कापड-उत्पादनातील घसरणारी गुंतवणूक 'रिबॉउंड' घेईल. परंतु कापडासाठीच्या यंत्रोत्पादनातील नव्या गुंतवणुकीकडून त्या रिबॉउंडला लगेच प्रतिसाद मिळणार नाही; कारण यंत्र हे भांडवल असल्यामुळे ते त्याचा वेळ घेणारच. परिणामी कापड-उत्पादनातील गुंतवणुकीचा रिबॉउंड कमकुवत होऊन नंतर हळूहळू विरघळेल; मात्र पूर्वीपेक्षा जास्त घन (Deeper) अपसरणाला जन्म देऊनच. अशा प्रकारे, भारतातील आजच्या अपसरणात एक अल्पकाळातील उपाय म्हणून अल्प व्याजदर महत्त्वाचा आहे; परंतु दीर्घ काळात परिव्यय-प्रभावी नवप्रवर्तन व कौशल्यनिर्मिती हे उपाय जास्त महत्त्वाचे आहेत.

संदर्भ सूची :-

१) Keynes, J. M., The General Theory of Employment, Intereset and Money; Macmillan and Co. Ltd., 1970, P. 161.

२) Ibid. 162.

३) Ibid. 163.

४) Cox Simon (Ed.), Economics : Making Sense of the Modern Economy, The Economist Newspaper Ltd., First South Asian Edition 2007, P. 278.

५) Quoted in Ibid., P. 264.

६) Quoted in Ibid.

७) Quoted in Ibid., P. 281.

८) Hurwicz Leonid quoted in Scientific Background on the Sveriges Ricksbank prize in Economic Sciences in Memory of Alfred Nobel 2007, Compiled by the Prize Committee of the Royal Sweedish Academy of Sciences, Pp. 4-5.

९) Valencia Matthew, The Economist, A Special Report on Financial Risk, Feb. 13-19, 2010, P.3



# उपयोजित समीक्षा : स्वरूप व चर्चा

डॉ. गोमटेश्वर पाटील

**प्रस्तावना**

मराठी समीक्षेच्या इतिहासामध्ये सैद्धान्तिक व तात्त्विक समीक्षा त्रोटक व काही समीक्षकांपुरती मर्यादित आहे. परंतु मराठीत व्यापक आणि विपुल अशी जी समीक्षा आहे, ती खऱ्या अर्थाने उपयोजित समीक्षा आहे. अगदी प्रारंभीच्या काळातल्या नियतकालिकांतील परीक्षणांपासून ते आजकालच्या वृत्तपत्रीय पुस्तक-परीक्षणांपर्यंत ही उपयोजित समीक्षा पसरलेली आहे. याशिवाय समीक्षालेखसंग्रह, वाङ्मयप्रकारांचा इतिहास, आस्वाद-आक्षेप, रसग्रहणे, लेखमाला, मराठी साहित्याला वाहिलेली नियतकालिके इथपासून अगदी विद्यापीठीय संशोधनापर्यंत व्यापक आणि विस्तृतपणे मराठी समीक्षेत ही उपयोजित समीक्षा पहावयास मिळते. या उपयोजित समीक्षेचे स्वरूप थोडक्यात पुढीलप्रमाणे मांडता येईल.

**उपयोजित समीक्षा : संकल्पना व स्वरूप**

मराठीत उपयोजित समीक्षा प्रारंभीपासूनच समृद्ध आणि विपुल आहे. किंबहुना मराठी समीक्षेची सुरुवातच उपयोजित समीक्षेतून झाली आहे. समीक्षा या संकल्पनेचा 'उपयोजित समीक्षा' हा एक भाग असून समीक्षा या व्यापक संकल्पनेची व्याप्ती मर्यादित करणारा हा शब्द आहे. साहित्याकडे पाहण्याचा एखादा दृष्टिकोन, झरोका, संदर्भचौकट या गोष्टी समीक्षेमध्ये महत्त्वाच्या असतात. उपयोजित समीक्षा म्हणजे साहित्यकृतीचे मर्मदर्शन. हे मर्मदर्शन एखाद्या झरोक्यातून, एखाद्या तात्त्विक किंवा सैद्धान्तिक संदर्भचौकटीतून होते. या समीक्षेचे विस्तृत स्वरूप मांडताना वसंत आबाजी डहाके म्हणतात, "'उपयोजित' हा शब्द 'अप्लाइड'ला प्रतिशब्द म्हणून मराठीत आता रूढ झाला आहे. विज्ञान, ज्ञान, कला यांच्या संदर्भात ही क्रिया निर्देशिली जाते. घटित, निष्कर्ष, विचार किंवा सिद्धान्त यांचा उपयोग करून एखादी गोष्ट, वस्तू यांचे स्पष्टीकरण करून घेणे, अशी ही क्रिया असते."[१] या उपयोजित समीक्षेविषयी विवेचनात ते म्हणतात, "'फंक्शनल' किंवा व्यावहारिक समीक्षेचे दोन भाग असून १) उपयोजित व २) प्रॅक्टिकल असे दोन वर्ग येथे कल्पिले आहेत. परंतु मराठीत उपयोजित आणि प्रॅक्टिकल (अभ्यासिन) म्हणजेच उपयोजित असे समीकरण रूढ झाले आहे. उपयोजित समीक्षा या शब्दयुग्मात समीक्षा हा शब्द प्रधान आहे. समीक्षा म्हणजे सर्जनशील कृतीबद्दलची जाणीवपूर्वक आणि व्यवस्थांकित प्रतिक्रिया. अशा प्रतिक्रियांवरील प्रतिक्रिया आणि साहित्यकलाविषयक विचार यावरील प्रतिक्रिया म्हणजे समीक्षा. येथे उपयोजित हे विशेषण आहे, हे उघड आहे. विशेषण विशेष्याचा अर्थ नियंत्रित करते, मर्यादित करते. समीक्षा या शब्दाने आपणास जे अभिप्रेत असेल; त्याचे नियंत्रण, त्याची मर्यादा आणि विवक्षितता 'उपयोजित' हा शब्द दर्शवितो. समीक्षेत कशाचे तरी उपयोजन असले, तरच ती समीक्षा उपयोजित समीक्षा म्हणून संबोधण्याजोगी होईल. उपयोजित समीक्षेमध्ये एखाद्या सर्जनशील कृतीला मुक्तपणे सामोरे जाता येत नाही. समीक्षेसाठी उपयोजित हे विशेषण एकदा स्वीकारल्यानंतर मुक्ततेवर बंधन हे आपोआप येते."[२] या विवेचनावरून उपयोजित समीक्षेच्या संकल्पनेचे व मर्यादेचे स्वरूप लक्षात घेता येईल.

मराठी समीक्षाव्यवहारामध्ये विशेषतः ८०च्या दशका-नंतर 'उपयोजित समीक्षा' हा शब्द रूढ झाला आहे. याआधी आस्वाद, आकलन, रसग्रहण, परीक्षण, निरीक्षण या क्षेत्रांच्या अनुषंगाने मराठीत जी विपुल समीक्षा होती, ती सर्वच समीक्षा उदारमतवादी दृष्टिकोनातून उपयोजित समीक्षेच्या छत्राखाली गृहीत धरली जात होती. आजही ती गृहीत धरली जाते. मराठीतील समीक्षा व उपयोजित समीक्षा यांच्या या सैलपणाबाबत वसंत आबाजी डहाके म्हणतात, "मराठीत 'समीक्षा' हा शब्द जसा सैलपणे वापरला जातो, तसे 'उपयोजित समीक्षा' हे शब्दयुग्मही सैलपणे वापरले जाते. याचा अर्थ असा की, सर्व व्यावहारिक समीक्षा, इतकेच नव्हे तर,

सर्जनशील कृतीसंबंधी कोणतेही विधान किंवा कोणतीही विधानमालिका उपयोजित समीक्षा म्हणून मानली गेली आहे."[३] मराठी समीक्षेबाबतही बहुतेकवेळा उपयोजित समीक्षेतील हा सैलपणा जाणवतो. उपयोजित समीक्षा प्रारंभीपासूनच साहित्यातील कलात्मक चर्चेपासून ते कारागिरीविषयीच्या मतनोंदणीपर्यंत आणि आकृतिनिष्ठ रूपवादापासून ते विद्यापीठीय अभ्यासक्रमाची सोय लावण्यापर्यंत विविध पद्धतींतूनही झाली असल्याचे दिसते. याशिवाय बराच काळ वाङ्मयीन वाद-चर्चा डोळ्यासमोर ठेवून साहित्यातील मतामतांचा वाद-प्रतिवाद करणारी समीक्षाही या समीक्षेमध्ये आढळते. साठोत्तर काळातही जे काही महत्त्वाचे वाङ्मयीन वाद-प्रवाह समीक्षेच्या क्षेत्रात झडत होते, त्यांच्या आधारेही अलीकडच्या मराठी समीक्षेत उपयोजित समीक्षा प्रत्ययास येते. असे हे उपयोजित समीक्षेचे दालन अत्यंत सैल, पायघोळ आणि काही वेळेस दिशाहीन, समीक्षकाच्या व्यक्तित्वाकडे झुकलेले, अभिनिवेशी असल्याचेही दिसते.

**उपयोजित समीक्षेचे परजीवित्व व परपोषिंदित्व**

समीक्षा हा व्यवहारच परजीवी व परपोषिंदा आहे. साहजिकच उपयोजित समीक्षा हा व्यवहारही परजीवी आहे. समीक्षा (सैद्धान्तिक अथवा उपयोजित) ही वाङ्मयीन कृतीनंतरची प्रतिक्रिया असल्याने तीसुद्धा परजीवी व परपोषिंदीच आहे. सैद्धान्तिक समीक्षेमागे काही तात्त्विक दृष्टिकोन, विविध ज्ञानशाखा, काही मूल्ये, मानवी जीवन व सामाजिक-सांस्कृतिक घटक इ. पोषण घटक असतात, जे प्रत्यक्ष साहित्यनिर्मितीच्या मागेसुद्धा असतात. कलाकृती अथवा साहित्यकृती ही स्वायत्त, अनन्यसाधारण व स्वतंत्र अशी निर्मिती आहे असे मानले, तरीही स्वतंत्र निर्मिती-स्वायत्त कलाकृती निर्माण होण्यासाठी सामाजिक-सांस्कृतिक घटक अप्रत्यक्षपणे का होईना, कारणीभूत असतातच. अगदी सौंदर्यवाद्यांच्या मतेसुद्धा साहित्याच्या/कलाकृतीच्या मागे सांस्कृतिक व सामाजिक अथवा जीवननिष्ठ पार्श्वभूमी असतेच असते. सैद्धान्तिक समीक्षा असो किंवा साहित्यकृतीची निर्मिती असो, या दोन्ही गोष्टींच्या निर्मितीमागे विशिष्ट दृष्टिकोन, समाज, संस्कृती, मानवी जीवन इ. गोष्टींची पार्श्वभूमी असते. या दोन्ही घटकांवर आधारलेली म्हणजेच सैद्धान्तिक समीक्षेतील काही तत्त्वे-दृष्टिकोनांचा आधार घेऊन आणि मूळची कलाकृती-साहित्यकृती आधाराला घेऊन त्यावरची प्रतिक्रिया, तिचे निरीक्षण, परीक्षण, आस्वादन, तिच्या रूपनिष्ठतेचा शोध, तिचे मूल्य ठरविण्याचे काम उपयोजित समीक्षा करते. या अर्थाने उपयोजित समीक्षा ही परजीवी व परपोषिंदी असते, असे येथे म्हणावयाचे आहे.

उपयोजित समीक्षेच्या वरील विवेचनाबाबत रा. ग. जाधव यांचे मत येथे लक्षात घेतल्यास याचे अधिक स्पष्टीकरण होण्यास मदत होईल. त्यांच्या मते, "उपयोजित समीक्षा म्हणजे अर्थनिर्णयन, विश्लेषण व मूल्यमापन इत्यादी प्रक्रिया ज्या तात्त्विक किंवा सैद्धान्तिक संदर्भचौकटीच्या आधारे केल्या जातात, ती चौकट गृहीत धरून अथवा अध्याहृत ठेवून केलेले विशिष्ट साहित्यकृतीचे किंवा साहित्यिकाचे विवेचन, असे स्थूल मानाने म्हणता येईल. या समीक्षेत विवेचनाची गरज म्हणून प्रसंगी अध्याहृत तत्त्वे कमी-अधिक प्रमाणात विशदही केली जातात. उपयोजित समीक्षेत अवलंबलेली तात्त्विक भूमिका प्रच्छन्नपणे कार्यरत असते, असे म्हणता येईल."[४] या विवेचनात उपयोजित समीक्षा ही तात्त्विक किंवा सैद्धान्तिक संदर्भचौकटीच्या आधारे केली जाते, ही गोष्ट लक्षात घेतल्यास उपयोजित समीक्षेचे परावलंबित्व लक्षात येईल.

**उपयोजित समीक्षेविषयी काही मतमतांतरे**

समीक्षेमध्ये सैद्धान्तिक समीक्षेतील तत्त्वघटकांच्या आधारे व त्याचप्रमाणे प्रत्यक्ष साहित्यकृती अथवा साहित्यिक यांच्या आधारे ही उपयोजित समीक्षा मांडली गेली आहे. या समीक्षेविषयी विविध मतमतांतरे दिसतात. या समीक्षेविषयी किशोर सानप म्हणतात, "उपयोजित समीक्षेत प्रत्यक्ष साहित्यकृतीच्या परिशीलनातून, आस्वादातून, चिंतन आणि आकलन यांतून निर्माण झालेल्या समीक्षा-लेखनाचा समावेश होत असतो. उपयोजित समीक्षेत तात्त्विक समीक्षेतले सिद्धान्तव्यूह, संस्कृतिनिष्ठ आणि जीवननिष्ठ संदर्भ, परंपरा आणि भूमिका मूलगामी नसतात, तर त्या अध्याहृत व आधारित असतात."[५]

अविनाश सप्रे यांच्या मते, "प्रत्यक्ष साहित्यकृतीच्या परिशीलनातून, आस्वादातून निर्माण झालेले समीक्षालेखन 'उपयोजित समीक्षा' या सदराखाली येते." मासिके,

वर्तमानपत्रांच्या आवृत्त्या, साप्ताहिके, मान्यवरांनी लिहिलेल्या साहित्यकृतीच्या प्रस्तावना, वेळोवेळी होत असलेल्या वाङ्मयीन चर्चासत्रांसाठी लिहिलेले निबंध, विद्यापीठीय अभ्यासक्रमांच्या निमित्ताने आणि परीक्षा डोळ्यांसमोर ठेवून केलेले लेखन आणि संशोधनाच्या नावाखाली झालेले प्रबंधलेखन, अशा अनेक निमित्तांनी उपयोजित मराठी समीक्षालेखन मराठीमध्ये केले जात आहे.

उपयोजित समीक्षेविषयी अरविंद कुलकर्णी यांनी आपली भूमिका अशी मांडलेली आहे– "उपयोजित समीक्षा म्हणजे एखाद्या साहित्यकृतीचे मर्मदर्शन घडवू पाहणारा एखादा झरोकाच होय. त्यात साहित्यविषयक सिद्धान्ताची चर्चा येत नाही. पण अशा सिद्धान्ताचा आधार उपयोजनाला आवश्यक असतो. आधारभूत सिद्धान्ताचे स्वरूपही साहित्यकृतिगणिक उपयोजकाला बदलून घ्यावे लागते. शेवटी प्रत्येक साहित्यकृती ही कुठल्यातरी प्रकारातून अस्तित्वात येत असते. प्रकारातील विभागणी मान्य असो वा नसो, उपयोजकाला त्या त्या साहित्यप्रकारासह विचार करावा लागतो. या प्रकारांचा विचार करताना काही सैल व लवचीक नियमावलीच्या आधारे विचार करावा लागतो. उपयोजित समीक्षेमध्ये हा लवचीकपणा साहित्यप्रकाराच्या अनुषंगाने महत्त्वाचा आहे." [६] साहित्यकृतीच्या प्रकारातील लवचीकपणाबरोबरच या समीक्षेमध्ये 'आशयाचे' नेमके निदान करणे उपयोजकाला आवश्यक आहे. कुलकर्णी हा मुद्दा उपयोजित समीक्षेमध्ये महत्त्वाचा मानतात. म्हणजे "आशयाचे स्वरूप सामाजिक वगैरे कसे आहे, हे लक्षात घ्यावे लागते. अशीच दृष्टी साहित्यातील वाद, संप्रदाय, पंथ यांच्याही बाबतीत त्याला ठेवावी लागते." [७] उपयोजित समीक्षेत साहित्यकृतीचे मर्मदर्शन घडविताना काही सिद्धान्तांचा आधार, या सिद्धान्तांची साहित्यकृतिगणिक लवचीकता, उपयोजकाला (समीक्षकाला) या समीक्षेत साहित्याचे प्रकार गृहीत धरावे लागणे, त्याचप्रमाणे आशयाचे नेमके निदान करून त्या अनुषंगाने साहित्यातील वाद, संप्रदाय, पंथ यांचेही भान ठेवावे लागते. साहित्याचे मर्मदर्शन घडविण्यासाठी अरविंद कुलकर्णी उपयोजित समीक्षेत 'झरोक्याचे तत्त्व' हे एक महत्त्वाचे तत्त्व मांडतात.

उपयोजित समीक्षेविषयी अरविंद वामन कुलकर्णी यांची आणखी काही महत्त्वाची विधाने येथे उद्धृत करण्यासारखी आहेत.

"समीक्षेच्या एकूण व्यवहाराला जशी शुद्ध, सैद्धान्तिक-चर्चेची आवश्यकता असते, तशीच स्फुट स्वरूपातील उपयोजित चर्चेला सैद्धान्तिक चर्चाच उपयोजनेत आवश्यक असणाऱ्या मुद्द्यांची रसद पुरवीत असते." [८]

"वृत्तपत्रे आणि नियतकालिके ही प्रामुख्याने उपयोजित समीक्षेची प्रमुख वाहक होत. वृत्तपत्रांच्या साप्ताहिक पुरवण्या आणि मासिके यांत नेहमीच पुस्तक-परीक्षणाला आवर्जून स्थान मिळताना दिसते. तिथे परिचय, अभिप्राय, विश्लेषण किंवा धावते परीक्षण अशा तुलनेने जुजबी गोष्टींना महत्त्व दिले जात असल्याचे जाणवते. साहित्यकृतिगणिक सौंदर्याचे मार्मिकपणे दर्शन घडविणे तिथे होतेच, असे नाही." [९]

"उपयोजित समीक्षेच्या संदर्भात समीक्षक, त्याची भूमिका, त्याला मान्य असणारी नियमावली या गोष्टी फारशा महत्त्वाच्या नसतात; तर साहित्यकृती आणि तिची मागणी हीच महत्त्वाची बाब असते. प्रत्येक साहित्यकृती तिच्या मर्मसौंदर्याचे विश्व विशिष्ट झरोक्यातून पाहणाऱ्या डोळ्यांनाच दाखविणे पसंत करते. असा नेमका झरोका ओळखणे हे समीक्षकाचे काम होय." [१०]

"(कलाकृतीचा) प्रकृतिगणिक, स्वतंत्रतेचा कल लक्षात घेऊन तिला अनेकविध संदेहांचा फायदा देत, आपली मोर्चेबांधणी उपयोजित समीक्षेने करायला हवी." [११]

"समीक्षकांच्या आत्माविष्काराला उपयोजित समीक्षा चांगला वाव देते, असेही म्हणता येईल. सैद्धान्तिक चर्चेत असा फारसा वाव नसतो." [१२]

अशी ही उपयोजित समीक्षापद्धती थोडीशी लवचीक, मर्मग्राही, समीक्षकाला दृष्टिकोन ठरविण्याचे स्वातंत्र्य देणारी, आस्वादक, सौंदर्यवृत्ती जोपासणारी समीक्षापद्धती आहे.

अशा या अनेकार्थी व अनेकविध समीक्षेविषयी रा. ग. जाधव म्हणतात, – "खरेतर चांगल्या व श्रेष्ठ साहित्यकृतीची बहुमितीय गुणवत्ता व अनेकार्थता हीच बहुधा उपयोजित समीक्षेच्या विविध रूपांना व प्रकारांना जन्म देत असते." [१३]








चांगल्या साहित्यात बहुमितीय गुणवत्ता असली; तरी बऱ्याच वेळा उपयोजित समीक्षेमध्ये साहित्यकृतीच्या सर्वच मितींवर एकाच वेळी प्रकाश टाकणे अशक्य असते. अरविंद कुलकर्णी यांनी म्हटल्याप्रमाणे एखादाच 'झरोका' उपयोजित समीक्षेत साहित्यकृतीच्या एखाद्या पैलूवर प्रकाश टाकू शकतो. साहित्यकृतीच्या या बहुमितीय अनुभवामुळेच व एकाच साहित्यकृतीकडे बघण्याच्या विविध दृष्टिकोनांमुळे उपयोजित समीक्षेत प्रकार संभवतात. साहित्यकृतीचे रूप आणि साहित्यकृतीचा प्रकार यांवरून उपयोजित समीक्षेत अनेक पद्धती शक्य असतात.

**उपयोजित समीक्षेचे वर्गीकरण**

उपयोजित समीक्षेच्या या पद्धतींचे वर्गीकरण काही समीक्षकांनी केले आहे.

१) प्रमेयदर्शी समीक्षा.

२) परिणामदर्शी समीक्षा.

३) निर्णायक समीक्षा.

४) तत्त्वदर्शी समीक्षा.

५) आस्वादक समीक्षा.

६) शास्त्रीय नवजीवनवादी समीक्षा.

अशी उपयोजित समीक्षेची व्यवस्था स्थूलमानाने अविनाश सप्रे यांनी लावली आहे.

अविनाश सप्रे यांच्याप्रमाणेच रा. ग. जाधव यांनी उपयोजित समीक्षेच्या वर्गीकरणाचे काही निकष व विविध दृष्टिकोन व्यक्त केले आहेत. यांमध्ये —

१) समीक्षेचे विषय, साहित्यप्रकार, या समीक्षेसाठी प्रकटपणे उपयोजित केलेल्या पद्धती व प्रणाली.

२) या समीक्षेतील लक्ष्य विषय असणारा दृष्टिकोन. यामध्ये लेखकलक्ष्यी, लेखनलक्ष्यी, वाचकलक्ष्यी व संस्कृतिलक्ष्यी इ. दृष्टिकोनांतून होणारी समीक्षा व समीक्षेतील शैलीविशेष.

३) साहित्यातील मोठे प्रवाह वा संप्रदाय यांसारख्या निकषांच्या आधारे होणारी उपयोजित समीक्षा.

याशिवाय उपयोजित समीक्षेचे १) वर्णनात्मक स्वरूपाचे व २) मूल्यनिरपेक्ष असे विषयनिष्ठ वर्गीकरणही त्यांनी केले आहे. ३) समीक्षेच्या मागे कोणतेही मूल्य अथवा दृष्टिकोन नसणारी अशी संकीर्ण समीक्षा म्हणता येईल, असा एक समीक्षेचा प्रवाहही मराठीत असल्याचे रा. ग. जाधवांनी म्हटले आहे.

अविनाश सप्रे, अरविंद कुलकर्णी व रा. ग. जाधव यांनी अशी उपयोजित समीक्षेची वर्गवारी लावण्याचा प्रयत्न केला आहे. परंतु उपयोजित समीक्षेबाबत या तिघाही समीक्षकांची एकवाक्यता दिसत नाही. या तिघांच्या विवेचनावरून उपयोजित समीक्षेच्या अनेक शक्यता व दृष्टिकोन संभवतात.

**उपयोजित समीक्षेविषयीच्या दोन भूमिका**

उपयोजित समीक्षा अनेकांगी शक्यतांच्या पातळीवर असली, तरी तिची गुणात्मकता ठरविताना रा. ग. जाधव, अविनाश सप्रे यांनी या समीक्षेत 'सामाजिक-सांस्कृतिक संदर्भाची आवश्यकता', तर अरविंद कुलकर्णी यांनी 'झरोक्याचे तत्त्व' प्रतिपादित करून कलाकृतीकडे पाहण्याचा अनेकांगी पण स्वायत्त दृष्टिकोन व्यक्त केला आहे.

**१. उपयोजित समीक्षेत आवश्यक असणारी सांस्कृतिक-सामाजिक संदर्भाची व सांस्कृतिक वास्तवाची भूमिका**

उपयोजित समीक्षेच्या वर्गीकरणाबाबत ठोस निकष मांडून उपयोजित समीक्षेचे 'साहित्यशास्त्र' (समीक्षाशास्त्र) निर्माण होऊ शकत नाही. उपयोजित समीक्षेची गुणात्मकता ठरविताना रा. ग. जाधव जी कारणे सांगतात, त्यावरून सामाजिक-सांस्कृतिक संदर्भाची, वाङ्मयीन वादाच्या संदर्भाची भूमिका त्यांना आवश्यक आहे, असे वाटते. याविषयी ते म्हणतात, "या समीक्षेने काही वाङ्मयबाह्य संदर्भही अलीकडच्या काळात स्वीकारले आहेत. याचे प्रत्यंतर आपणास मराठी समीक्षाव्यवहारात अलीकडे निर्माण झालेले वाङ्मयीन वाद व सामाजिक-सांस्कृतिक संदर्भ लक्षात घेऊन आणि या वादांचे व सामाजिक-सांस्कृतिक संदर्भाचे अध्याहृत तत्त्व लक्षात घेऊन वाङ्मयीन कृती अथवा प्रकारांची झालेली समीक्षा ही या समीक्षेला गुणात्मकतेकडे नेण्यास उपयोगी ठरते आहे." २०व्या शतकातील उपयोजित समीक्षेची गुणात्मक वाढ करणारी काही ठळक व काही धूसर कारणेही रा. ग. जाधव यांनी सांगितली आहेत. "मराठीतील सौंदर्यशास्त्रीय मांडणीचा समृद्ध अवतार, त्यामुळे उपयोजित समीक्षेतील अध्याहृत तत्त्वे, संकल्पना व सिद्धान्त यांसंबंधी निर्माण

झालेली स्वच्छ जाणीव, नव्या प्रयोगशील व प्रभावी साहित्यप्रवाहांनी समीक्षेपुढे उभी केलेली आव्हाने व आव्हाने पेलू शकणारी समर्थ समीक्षकांची उपस्थिती, वाङ्मयीन नियतकालिकांनी स्वीकारलेली समीक्षाविषयक गांभीर्याची व जबाबदारीची भूमिका, प्रस्थापित साहित्य-समीक्षेविरुद्ध उफाळून आलेली मातब्बर प्रतिक्रिया आणि एकूणच समीक्षाव्यवहाराची उत्तरोत्तर वाढत गेलेली सामाजिक दखलपात्रता इत्यादी कारणे ठळकपणे लक्षात येतात. मात्र भारतीय स्वातंत्र्याच्या ऐतिहासिक महत्त्वाच्या टप्प्यावर रूपवादी साहित्य व समीक्षेचा झालेला प्रभावी उदय ही बाब खूपच गुंतागुंतीची आहे व सामाजिक-सांस्कृतिक स्थित्यंतराशी ती तशाच व्यामिश्र नात्याने निगडित झालेली आहे. उत्तरार्धातील उपयोजित समीक्षेतील गुणात्मक चढउतार हे केवळ वाङ्मयीन संदर्भात समजून घेता येतील, असे वाटत नाही. वाङ्मयबाह्य सामाजिक--सांस्कृतिक संदर्भातही ते जाणून घ्यावे लागतील, असे वाटते. दलित साहित्यसमीक्षेचे उदाहरण या संदर्भात मोठे अभ्यसनीय ठरेल, असे वाटते." [१४] रा. ग. जाधव यांच्या या विवेचनावरून स्वातंत्र्योत्तर काळात उपयोजित समीक्षेने स्वीकारलेल्या भूमिका येथे महत्त्वाच्या आहेत, असे वाटते. केवळ साहित्यकृती आणि साहित्यप्रकार समोर ठेवून आस्वादाच्या व व्यक्तिगत भावनांच्या तसेच तंत्रनिष्ठ सौंदर्यवादी भूमिकेपेक्षा मराठी उपयोजित समीक्षेची उत्तरोत्तर वाढत गेलेली समाज-संस्कृतिनिष्ठ भूमिका व त्यांचे संदर्भ उपयोजित समीक्षेला समृद्ध करण्यासाठी महत्त्वाचे आहेत.

या बाबतीत अविनाश सप्रे उपयोजित समीक्षेविषयी म्हणतात, "(साहित्याच्या आस्वादप्रक्रियेत) काही प्रश्न लेखकांच्या निर्मितीशी संबंधित असतात, काही प्रश्न वाचकांच्या आस्वादप्रक्रियेशी संबंधित असतात, तर काही प्रश्न लेखक आणि वाचक या दोन्ही घटकांना सामावून घेणाऱ्या 'सांस्कृतिक वास्तवा'शी संबंधित असतात. समीक्षकाला हे त्रिविध भान सातत्याने ठेवावे लागते."[१५]

उपयोजित समीक्षेला अर्थपूर्ण संदर्भचौकट प्राप्त होण्यासाठी लेखकाची निर्मितिप्रक्रिया व वाचकांची आस्वादप्रक्रिया यांच्या संदर्भाशिवाय 'सांस्कृतिक वास्तवाचा' संदर्भ समीक्षेला असणे महत्त्वाचे आहे. त्याचबरोबर समीक्षेमध्ये एक ठाम मूल्यव्यूह जो समीक्षकाच्या नैतिकतेशी संबंधित आहे, तो समीक्षेत कार्यरत असणे अविनाश सप्रे यांना महत्त्वाचे वाटते. समीक्षकाच्या या नैतिकतेला अविनाश सप्रे यांनी 'मूल्यभान' असे म्हटले आहे. त्यांच्या मते हे मूल्यभान निर्माण होण्यासाठी साहित्याबरोबरच समाजशास्त्र, मानसशास्त्र, तत्त्वज्ञान, जीवशास्त्र अशा विविध ज्ञानशाखांची मदत समीक्षकाला होत असते. हा अविनाश सप्रे यांचा दृष्टिकोन उपयोजित समीक्षेची संदर्भचौकट व गुणात्मकता निर्माण करण्यामध्ये महत्त्वाचा आहे.

रा. ग. जाधव व अविनाश सप्रे हे दोघेही समीक्षेची संदर्भचौकट आखताना या समीक्षेला सामाजिक व सांस्कृतिक संदर्भांची अपरिहार्यता लक्षात घेतात. केवळ वाङ्मयीन संदर्भ लक्षात घेणे, तसेच केवळ लेखकाची निर्मितिप्रक्रिया व वाचकांची आस्वादप्रक्रिया लक्षात घेणे, हे उपयोजित समीक्षेत संभ्रम निर्माण करण्यास कारण ठरण्याची शक्यता निर्माण करतात. म्हणून या समीक्षेमध्ये समीक्षकाचे मूल्यभान, समीक्षकाची नैतिकता, समीक्षेचा ठाम मूल्यव्यूह याचबरोबर वाङ्मयबाह्य सामाजिक--सांस्कृतिक संदर्भ आणि 'सांस्कृतिक वास्तवता' गरजेची आहे, अशी भूमिका अविनाश सप्रे घेतात. रा. ग. जाधव वाङ्मयबाह्य सामाजिक-सांस्कृतिक जीवनसंदर्भ हे उपयोजित समीक्षेच्या गुणात्मक वाढीस उपयोगी ठरतील, असे मत मांडतात. कोणत्याही समीक्षेचे निकष ठरविता येत नाहीत, असे म्हणतानाच साहित्यकृतीची परिवर्तनशीलता व जीवनसन्मुखता ते अपरिहार्य मानतात. "चांगली समीक्षा हीदेखील अखेरपक्षी एक हरण्याचा वा हरलेला डाव असतो, असेही म्हटले जाते. कदाचित साहित्याच्या अंगभूत व परिवर्तनशील अशा जीवनसन्मुखतेतच या यशस्वी-अपयशी समीक्षेचे कारण दडलेले असावे." [१६]

## उपयोजित समीक्षेबाबत अ. वा. कुलकर्णी यांचे 'झरोक्याचे तत्त्व' आणि त्यांची प्रकृतिनिष्ठ सौंदर्यवादी भूमिका

उपयोजित समीक्षेसंबंधी कोणतीही निश्चित भूमिका नसावी, पण तिच्या मुळाशी अनेकविध झरोके (दृष्टिकोन) असावेत, अशी लवचीक भूमिका घेणारे अरविंद वामन

कुलकर्णी यांचे मतही येथे लक्षात घ्यावे लागेल. त्यांच्या मते, उपयोजित समीक्षेबाबत वाद, संप्रदाय, प्रवाह, प्रकार अशी साहित्यकृतीची जातकुळी तपासून एखादी नियमावली सिद्ध करणे, तिच्या आधारे मूल्यमापन, तुलना यांचीही मदत घेऊन त्या कृतीच्या मर्माचा शोध घेणे हे काम होत असते. यात समीक्षकांची भूमिका महत्त्वाची नसते. "उपयोजित समीक्षेच्या संदर्भात समीक्षक, त्याची भूमिका, त्याला मान्य असणारी नियमावली या गोष्टी फारशा महत्त्वाच्या नसतात; तर साहित्यकृती आणि तिची मागणी हीच महत्त्वाची बाब असते. प्रत्येक साहित्यकृती तिच्या मर्मसौंदर्याचे विश्व विशिष्ट झरोक्यातून पाहणाऱ्या डोळ्यांनाच दाखविणे पसंत करते. असा नेमका झरोका ओळखणे हे समीक्षकाचे काम होय." [१७] समीक्षकाने आपले आग्रह बाजूला ठेवून समीक्षा लादनात्मक न होण्यासाठी साहित्यकृतीच्या मागणीचा वस्तुनिष्ठ विचार करणे, अनेकार्थता किंवा सूचकतासामर्थ्यामुळे श्रेष्ठ साहित्यकृतीबाबत नेमकी वस्तुनिष्ठता काय, याचाही सुगावा लागणे अशक्यप्राय असल्यामुळे येथे समीक्षकाचा दृष्टिकोन, त्याची भूमिका महत्त्वाची नसून साहित्यकृती व तिच्या रूपाची मागणी महत्त्वाची आहे हे लक्षात घेऊन साहित्यकृतीचे भावणारे स्वरूप व तिची प्रतीती यांवर समीक्षकाने भिस्त ठेवायला हवी. ही भिस्त प्रतीतीवर आधारलेल्या व सौंदर्यानुभवाची देवाण-घेवाण करणाऱ्या सर्वच ललित कलांत असते." [१८] उपयोजित समीक्षेमागे भूमिका, दृष्टिकोन, संदर्भ असणे हा भाग गौण असून प्रतीती आणि सौंदर्यानुभव ही कलावादी व स्वतंत्र कलानुभवाची बाजू अ. वा. कुलकर्णींना महत्त्वाची वाटते. "प्रकृतिगणिक स्वतंत्रतेचा कल लक्षात घेऊन तिला अनेकविध संदेहांचा फायदा देत, उपयोजित समीक्षेने आपली मोर्चेबांधणी करायला हवी." [१९] असे त्यांचे मत आहे. उपयोजित समीक्षेबाबत कलाकृतीची प्रकृती लक्षात घेऊन तिच्यावर 'कलाकृतीच्या मागणीप्रमाणे' एखाद्या विशिष्ट दृष्टिकोनातून (झरोक्यातून) प्रकाश टाकणे म्हणजे उपयोजित समीक्षा, हा अ. वा. कुलकर्णी यांच्या विवेचनातील मुद्दा महत्त्वाचा आहे.

### उपयोजित समीक्षा, आस्वादक समीक्षा आणि सौंदर्यानुभव

उपयोजित समीक्षेचा एक भाग म्हणजे आस्वादक समीक्षा व आस्वादक समीक्षेचा एक भाग म्हणजे रूपवादी समीक्षा आहे, असे अरविंद कुलकर्णी म्हणतात. "या समीक्षापद्धतीबाबत कलाकृतीचे स्वातंत्र्य, सौंदर्यानुभवाची देवाण-घेवाण, कलात्मक परिघात राहून केलेली शोधयात्रा, आशय-अभिव्यक्ती यांच्या अद्वैतातून सिद्ध झालेले त्या साहित्यकृतीचे रूप हाच तिचा शोधविषय असतो." [२०] या समीक्षापद्धतीत अनेक समीक्षापद्धती सामावल्या असून सौंदर्यवाद्यांचा लौकिकतेशी असलेला संबंध सांगताना आस्वादक समीक्षा हीच जीवनमूल्यांचा विचार करणारी समीक्षापद्धती आहे. 'सौंदर्यवाद्यांच्या दृष्टिकोनातून 'लौकिक घटकां'ची अलौकिक नियमानुसार बांधलेली संघटना म्हणजे साहित्यकृती' [२१] या तत्त्वानुसार आस्वादक समीक्षा लौकिकतेशी भिडणारी असल्याने तिच्यात जीवनमूल्यांचा विचार दुय्यम स्वरूपात येतो, असे अरविंद कुलकर्णी म्हणतात. कलाकृतीची स्वायत्तता-स्वतंत्रता, तिचे रूप, तिचे मर्मसौंदर्य अशा गोष्टी कलावादी सौंदर्यानुभवाच्या भूमिकेचे समर्थन करतात, हे त्यांच्या समीक्षादृष्टीत दिसते.

रा. ग. जाधव यांची सामाजिक-सांस्कृतिक जीवनसंदर्भाकडे झुकणारी समीक्षादृष्टी, अविनाश सप्रे यांनी घेतलेली मूल्यभान व समीक्षकांची नैतिकता ही भूमिका लक्षात घेतल्यास एकीकडे सामाजिक-जीवनवादी अशा उपयोजित समीक्षेविषयी या समीक्षकांची भूमिका, तर अरविंद कुलकर्णी यांनी घेतलेली कलावादी सौंदर्यनिष्ठ भूमिका अशी उपयोजित समीक्षेबाबत दोन भूमिकांची दिशा लक्षात येते.

### उपयोजित समीक्षेतील दोन प्रवृत्तींचे स्वरूप व त्यांची परस्परपूरकता

अगदी प्रारंभापासून मराठी समीक्षेत या दोन प्रवृत्ती अथवा दोन भूमिका आपणास दिसतात.

कलेचे विश्व स्वायत्त आहे, स्वतंत्र आहे, स्वयंपूर्ण आहे आणि अलौकिक आहे ही कलावादी भूमिकेमागची धारणा आहे. कलाकृतीच्या अंतर्गत रचनातत्त्वांचा विचार या भूमिकेत महत्त्वाचा मानला आहे.

कलेचे विश्व कलावादी मानतात त्या अर्थाने स्वायत्त








नाही. कलानिर्मिती ही जीवनातीलच एक अर्थपूर्ण कृती आहे. ती लौकिक, मानुष आणि मूल्यवान आहे, ही जीवनवादी भूमिकेमागची प्रेरणा आहे.

'कलात्मक काय?' आणि 'कृतक काय?' या दोन प्रश्नांतूनच मराठी उपयोजित समीक्षेत या प्रवृत्ती कार्यरत आहेत. १९५० नंतरच्या कालखंडातही जी समीक्षा मराठीत होताना दिसते, त्यामध्येही कलावादी भूमिका आणि जीवनवादी भूमिका याच दोन मध्यवर्ती आणि प्रमुख प्रवृत्ती म्हणून वावरताना दिसतात.

वाङ्मयीन कलाकृतीच्या निर्मितीमागे असणाऱ्या विविध प्रेरणा, विशिष्ट देशकालपरिस्थिती, समाज-संस्कृती, जीवनविश्व, वंश-परंपरा इ. क्षेत्रांतील शक्तीचा शोध घेत संशोधक-समीक्षक आपली पावले टाकीत असतो. परंतु त्याचबरोबर वाङ्मयीन कलाकृतीत काही वेळा काही अनामिक, अगोचर, अनपेक्षित व थोड्याबहुत अनाकलनीय प्रेरणाशक्ती, सौंदर्य, तिचे स्वायत्त रूप या गोष्टींचाही काही भाग असतो, याची दखल संशोधकाला घ्यावी लागते. संशोधन-समीक्षेच्या या दोन दृष्टिकोनांतूनच जीवननिष्ठ-समाजनिष्ठ आणि रूपवादी-कलात्मक अशा परंपरा निर्माण झालेल्या दिसतात. साहित्यकृतीने आपले सत्त्व कोणत्या क्षेत्रातून शोषले आहे, त्या क्षेत्राशी आपल्या दृष्टिकोनाची नाळ जोडलेली ठेवून जी समीक्षा झाली आहे, तिला आपण तात्त्विक-मूलगामी समीक्षा असे म्हटले आहे, त्याचप्रमाणे साहित्यकृतीच्या निर्मितीनंतर तिच्या घाटावर, सेंद्रियत्वावर, एकात्म अनुभवावर आधारलेली जी समीक्षा, तिला उपयोजित समीक्षा असे म्हणता येईल. तथापि या दोन्ही समीक्षा एकमेकींशी परस्परपूरक असतात. जीवननिष्ठ व समाजनिष्ठ समीक्षेला केवळ जीवनवादी-समाजनिष्ठ कलेविषयी तात्त्विक चर्चा करता येणार नाही. तसे झाल्यास समीक्षा हे एक शास्त्र होईल. पण समीक्षा ही एक सर्जनशील प्रक्रिया असल्यामुळे, साहित्याच्या कलात्मकतेचा शोध तिला घ्यायचा असल्यामुळे, तिला साहित्याच्या सौंदर्यशास्त्राकडे मार्गदर्शनासाठी वळावे लागते. जीवनवादी समीक्षकांना साहित्यातील सौंदर्यशोधासाठी कलेच्या स्वातंत्र्याकडे, स्वायत्ततेकडे वळावे लागते, तर साहित्याचा आशय, आविष्कार जीवनविषयक व सामाजिक धारणांनी बांधील असल्याने कलावाद्यांना मानवी जीवन व समाजाविषयी बांधीलकी स्वीकारावीच लागते. या दोन्ही परंपरांत समीक्षकांनी आशयाला प्राधान्य दिले आहे की, अभिव्यक्तीला, यावरून त्यांचा समीक्षाविषयक दृष्टिकोन ठरण्यास मदत होते.

**संदर्भसूची :-**

१) वसंत आबाजी डहाके, आलोचना, डिसेंबर, १९८८ पृ. १४.
२) तत्रैव पृ. १४.
३) तत्रैव पृ. १७.
४) रा. ग. जाधव, विसाव्या शतकातील मराठी, संपा. विलास खोले, पुणे, प्रतिमा प्रकाशन, प. आ. २००४ पृ. १२८.
५) किशोर सानप, भालचंद्र नेमाडे यांची समीक्षा, औरंगाबाद, साकेत प्रकाशन. २००५, पृ. ६९.
६) अ. वा. कुलकर्णी, उपयोजित समीक्षा : लक्षणे आणि पडताळणी, मेहता पब्लिकेशन हाऊस, पुणे. २००३.
७) तत्रैव पृ.
८) तत्रैव पृ.
९) तत्रैव पृ.
१०) तत्रैव पृ.
११) तत्रैव पृ.
१२) तत्रैव पृ.
१३) तत्रैव पृ.
१४) रा. ग. जाधव, विसाव्या शतकातील मराठी समीक्षा. उ. नि. पृ. १२९.
१५) तत्रैव पृ. १४३.
१६) विसाव्या शतकातील मराठी समीक्षा, उ. नि. पृ. ३.
१७) उपयोजित समीक्षा : लक्षणे आणि पडताळणी, उ. नि. पृ. ३.
१८) तत्रैव पृ. ३.
१९) तत्रैव पृ. ५.
२०) तत्रैव पृ. ५.
२१) तत्रैव पृ. ७.








# उपाध्ये आम्नायप्रवर्तक : ज्ञानतपस्विनी आचार्यश्री कमळाइसा

डॉ. अविनाश आवलगावकर

महानुभाव पंथाचे संस्थापक सर्वज्ञ श्रीचक्रधरस्वामींनी उत्तरपंथे प्रयाण करण्यापूर्वी भटोबास उर्फ श्रीनागदेव यांना पंथाचे पहिले आचार्य केले. हे आचार्यपद त्यांनी शेवटपर्यंत निष्ठेने, सेवाबुद्धीने आणि स्वामींचे अधिकृत पायिक या जाणिवेतूनच सांभाळले. त्यामुळे त्यांच्या वागण्यात सदैव ज्ञान आणि भक्तीचा संगमच दिसून आला. आचार्यांनी आपल्या अंतकाळी पंथाची धुरा बाइदेवबास यांच्यावर सोपविली. महानुभावांच्या 'इतिहास प्रकरणा'त याचे सविस्तर विवेचन आलेले आहे. बाइदेवबासांनंतर पंथाचे आचार्यपद कवीश्वरबासांकडे आले. कवीश्वराचार्यांनंतर पंथाचे चौथे आचार्य म्हणून परशरामबासांकडे पंथाची धुरा आली. सर्वज्ञांच्या नंतर परशरामबासांपर्यंत म्हणजे चौथ्या आचार्यांपर्यंत पंथाचा व्यापार अगदी सुरळीत चालला होता. परंतु, परशरामबास आचार्य असतानाच पंथात मतभेद निर्माण होऊन पंथाचे विभाजन होऊ लागले होते. अर्थात भविष्यात पंथाची स्थिती अशी होणार असल्याचे सूतोवाच खुद्द श्रीनागदेवाचार्यांनी आधीच केले होते. यासंबंधीची एक सूचक आख्यायिका 'स्मृतिस्थळा'त [१] आलेली आहे, ती अशी-

"एक दिस देमाइसीं स्वप्न देखीलें : तें सवळेचि : भटोबासांपूढां सांघितलें : "भटो मीयां रात्रीं स्वप्न देखीलें : चौघेजण आले : ते रांजणु नेताति : तंवं मीया म्हणीतलें : "काइसया न्यालगा बा" म्हणौनि : मीं रांजणु पोंटेंसीं धरीं : नेउं नेदी : तंवं एके म्हणीतलें : "आगा इचिए वोंटीए तिनी आंजोळी रत्नें घाला :" तंवं मीं जार्गी जालीयें :" ऐसे स्वप्न भटोबासीं आइकीलें : आणि म्हणीतलें : "आतां मज गोसावियांचा हांकारा एइल : रांजणु तो मी : रत्नें तियें गोसावियांचें शास्त्र : तिनी आंजोळीयें ते तीन्ही अधिष्ठानें करूनि : मार्ग वर्तैल : वृद्धाचारादी क्रमें करूनि : तिनी अधिष्ठानें जाणावीं :।।"

देमाइसाला पडलेले स्वप्न आणि आचार्यांनी लावलेला त्याचा अर्थ अगदीच खरा ठरला. आचार्यांनंतर तीन अधिकरणापर्यंत सर्वज्ञांचा परिवार एकत्र टिकून होता. म्हणजे बाइदेवबास, कवीश्वराचार्य आणि परशरामव्यास या तीन आचार्यांपर्यंत एकच अधिष्ठान होते; आणि सर्व परिवार या अधिष्ठानाच्या आज्ञेनेच वागत होता. परंतु परशरामव्यासांच्या आचार्यपदाच्या उत्तरार्धात पंथात तेरा शाखा अर्थात तेरा आम्नाय निर्माण झाले. हे तेरा आम्नाय म्हणजे - १) उपाध्ये, २) कवीश्वर, ३) पारिमांडल्य ४) अमृते, ५) मदालसा, ६) कुमर, ७) यक्षदेव, ८) दामोदर, ९) हरिदेव, १०) जयदेव, ११) साळकर, १२) दिवाकर, १३) महेश्वर हे होत.

लीळाचरित्राची मूळ प्रत धाडीत गेल्यानंतर पुन्हा लीळाचरित्राची बांधणी करण्याकरिता महानुभाव पंडितांचे प्रयत्न सुरू झाले. श्रीनागदेवाचार्यांकडून लीळाचरित्राचा घोक अनेकांनी घेतलेला असल्याने त्याच्या आधारे पुन्हा लीळाचरित्राची निर्मिती सुरू झाली. 'इतिहास प्रकरणा'तील [२] नोंदीनुसार "ऐसे थोरले पुस्तक– लीळाचरित्र गेलेआनंतरें मुखिचेनिं घोकें लीळांसी तेरा आम्नाय जाले :" म्हणजे लीळाचरित्राची बांधणी करताना जे निरनिराळे पाठ झाले, त्यांतूनच तेरा आम्नायांची निर्मिती झाली. अर्थात ही शक्यता नाकारता येणार नाही. परंतु त्याचबरोबर यासंबंधी डॉ. रमेश आवलगावकर म्हणतात. [३] त्याप्रमाणे – "पंथ विस्तारत गेला तसे वेगळे कर्तृत्व करण्याची वृत्ती या महानुभावांत निर्माण झाली. श्रीचक्रधरस्वामींच्या तत्त्वांचा विविध अंगांनी अन्वय लावणे हे त्या वेळी विद्वत्तेचे लक्षण समजले जाई व तो विद्वान पंथ व समाजमान्य होई. अनेकदा आपण लावलेला अर्थ इतरांना समजू नये, म्हणून तो केवळ आपल्याजवळ अनुसरलेल्या शिष्यांना सांगितला जाई. नंतर ही परंपराच सुरू झाली असावी." डॉ. आवलगावकरांचा हा विचारही चिंतनीय आहे. आचार्य परशरामव्यासांनाही विद्वानांमधील चुरशीची जाणीव झाली असावी, आणि पंथाच्या

अस्तित्वाला कोणतीही बाध्यता येऊ नये, आणि पंथाचे व्यवस्थापन नीट चालावे, म्हणून स्वतः आचार्य परशरामव्यासांनीच तेरा शाखांत पंथाची विभागणी केली असावी.

या संदर्भात डॉ. वि.भि. कोलते यांचेही मत लक्षात घेण्यासारखे आहे. त्यांच्या मते "त्यांचे (श्रीनागदेवाचार्यांचे) जे अनेक शिष्य होते, त्यांनी स्वतःची शिष्यपरंपरा वाढविण्यास सुरुवात केली. सर्व गुरुकुलाचे एक प्रधान आचार्य विद्यमान असताही त्यांनी आपल्या शिष्यांना आपणच उपदेश द्यावयास सुरुवात केली. कदाचित एका आचार्याला या अनेक लोकांना उपदेश देण्याचे कार्य कालाभावी आवरता येणे शक्य नसल्यामुळे ज्येष्ठ व श्रेष्ठ महानुभावांना शिष्य करण्याची व उपदेश देण्याची परवानगी प्रमुख आचार्यांनी दिली असणे संभवनीय आहे. काहीही असले, तरी अनेक गुरू व त्यांच्या स्वतंत्र शिष्यशाखा निर्माण झाल्या." [४] श्रीनागदेवाचार्यांची भविष्यवाणी खरी ठरली, एवढे मात्र खरे.

या तेरा आम्नायांपैकी उपाध्ये आम्नायाचे नेतृत्व श्रीनागदेवाचार्यांची शिष्य असलेल्या कमळाइसा या स्त्रीने केले, आणि पंथासमोर एक आदर्श घालून दिला. महानुभावपंथाने सर्वच बाबतींत समानतेचे सूत्र अवलंबिले आहे. स्त्रियांचा हेवा करणाऱ्या सारंगपंडितांना श्रीचक्रधरस्वामींनी "हां गा : तुमचे जीव : मग यांचीया काइ जीउलीया? तुमतें आनु देओ राखता : आणि यांतें काइ आनु देओ राखता? ऐसें काइ एथ असे?" [५] असे ठणकावून विचारले. स्त्री-पुरुषांचे समानत्व मान्य करून स्त्रियांनाही पुरुषांप्रमाणेच धर्माचा अधिकार असल्याचे स्पष्ट केले. स्त्रियांच्या ठिकाणी असलेल्या न्यूनगंडाला घालवून स्वामींनी त्यांना आत्मसन्मानाचे धडे दिले. महाराष्ट्राच्या सांस्कृतिक व सामाजिक इतिहासात स्त्रीसमानतेची ही पहिली नांदी ठरली.

महानुभावपंथाच्या विकासात स्त्रियांचा वाटा खूपच महत्त्वाचा आहे. 'म्हातारी चर्चिक म्हातारी जिज्ञासक : म्हातारी एथ काहीतरी पुसतचि असे :' असा ज्या महदाइसाचा गौरव स्वामींनी केला, त्या महदाइसानेच स्वामींचा पंथ राखला. स्वामींच्या विरहाने दग्ध होऊन बेशुद्धावस्थेत पडलेल्या श्रीनागदेवाचार्यांना तिनेच उचलून आणले व स्वामींनी त्यांच्यावर सोपविलेल्या अवतारांच्याही अनेक लीला प्राप्त करून महदाइसांनी पंथाच्या वाङ्मयीन कामगिरीला मोठा हातभार लावला. लीळाचरित्र धाडीत हरवल्यानंतर त्याची पुनर्बांधणी करण्यातही कमळाइसाची शिष्य असलेल्या हिराइसा या प्रज्ञावंत स्त्रीचाच मोठा सहभाग आहे.

महानुभावपंथात अशा अनेक कर्तृत्ववान स्त्रिया होऊन गेल्या. उपाध्ये आम्नायप्रवर्तक कमळाइसा या त्यांपैकीच एक होत. कमळाइसा ह्या जानो उपाध्येंच्या भावाची म्हणजे पुरुषोत्तमदेव उपाध्ये यांची कन्या होय. औरंगाबाद जिल्ह्यातील बळेगाव (बल्हेग्राम) हे उपाध्यांचे गाव. कमळाइसाचे लग्न झाल्यावर तिला लवकरच वैधव्य आले. तेव्हा चुलते जानो उपाध्ये तिला घेऊन आले. "मार्गि नामश्रवण केलें : मग भटोबासापासि घेउनि आलें : निरोवीलें झोळी देवविली : श्रवण करविलें : श्रवण करितां भटोबासी म्हणितलें :". "दादो तुम्हीं काइ आणि देव सांघितला : आन मी काइं आणिक देव सांघेन :" उपाध्यी म्हणितले : "भटो मियां सांघितला : तो ममताजनित :" तवं भटोबासी म्हणितलें : "नां दादो तुम्हिं काइं ममतेसि उरलें आसा :" उपाध्यी म्हणितलें : "ते तैसेंचि : परि गोसावी तुम्हांसी अधिकर्ण केलें आसें : तुम्हांसि देवें दवो सांघितला : तो सांघावे :" "हो कां" म्हणौन भटोबासी :। : कमळाइसासि माहावाक्य श्रवण केलें : पंडित केसवदेव नाति नागाइसे तयासि भटोबासें निरुक्तिचें माहावाक्य नीर्वचन : उद्धरण : अस्तिपरि : याचे श्रवण करीत होते : ति पांति कमळाइसा श्रवण केले : भटोबासाचें निरूपण आइकिलिया नंतरे : पंडित केसव : नाति नागाइसें आपुला ठाइ विजनि : चिंतनीचि धर्मवार्ता करिति : तेथेहि कमळाइसे आइकति : यापरी चरित्राचें इतिहास : पूर्वार्ध : उत्तरार्ध : तथा निरुक्त : तथा रुद्धपूर ऐसी पाचहिं रूपें घोकिली : व्याख्यान परीसिले : ऐसे आठ वर्सः भटोबासांचे सन्निधान जालें:"[६]

'उपाध्ये आम्नायाचे अन्वयस्थळ' मधील या माहितीवरून काही गोष्टी ठळकपणे स्पष्ट होतात. पहिली गोष्ट म्हणजे कमळाइसाला आणतानाच उपाध्यायांनी तिला मार्गी नामश्रवण केले. त्यानंतर तिला आचार्य नागदेवांकडे सोपविले. त्या वेळी आचार्य उपाध्यांना

विनम्रतेने म्हणतात, की मी काय वेगळा देव सांगणार आहे का? त्यावर तेवढ्याच विनम्रतेने उपाध्ये भटोबासांना त्यांच्या अधिकाराची जाणीव करून देतात. अधिकर्णानेच श्रवण करावे, आणि त्यातही तुम्हाला प्रत्यक्ष देवानेच देव सांगितला आहे, तो सांगावा म्हणून विनवणी करतात. जानो उपाध्यांच्या या विनंतीला आचार्य मान्यता देतात. यावरून आचार्य म्हणून भठोबासांनाच 'श्रवण' करण्याचा अधिकार होता, हे स्पष्ट होते. आणखी महत्त्वाची गोष्ट म्हणजे कमळाइसांचा अधिकारही मोठा होता. दामोदरपंडित, केशिराजव्यास, नाती नागाइसा यांच्यासोबत कमळाइसांना आचार्यांकडून श्रवण झाले, आणि त्यानंतर या निरूपणावर ही सर्व मंडळी धर्मवार्ता करीत असायची. 'तेथेही कमळाइसे आइकति.' म्हणजे आचार्यांचे निरूपण, पंडितांशी झालेला वार्तालाप यांतून कमळाइसांचा ईश्वरी तत्त्वज्ञानाचा सखोल अभ्यास होऊ लागला होता. अशी आठ वर्षे कमळाइसांनी आचार्यांच्या सहवासात घालवली. अर्थात या काळात त्यांचा ब्रह्मविद्याशास्त्राचा आचार्यांच्या मुखातून घोक झालेला होता.

पुढे पंडिता कमळाइसांचे चुलते जानो उपाध्ये वृद्धत्वामुळे अत्यंत क्षीण झाले. "मग भटोबास कमळाइसातें म्हणितलें : आता तुम्ही उपाध्यांचे नाव सारावें : ते तुमचे निमित्त :" कमळाइसी म्हणितलें : "भटों तुमचि अज्ञा प्रमाण : तुम्हि उपाध्याते मानवावें :" "हो कां :" मग भटोबासी उपाध्याते म्हणितलें : "दादो हे कमळाइसी मी आपण होउनी तुम्हांसि सीक्षीणि करुनि देत असें : तरी मजकारणे तुम्हीं इयेचा अंगिकार करावा :" "हो कां" म्हणौन मानिलें मग कमळाइसी उपाध्याचा हाति पांच पोफळ घातली : पांच दंडवत घातली : मग भटोबासी अशेसा गुरुकुळाते म्हणितलें : "यातें उपाध्य कमळाइषे ऐसें म्हणावें :" ते गुरुकुळ मानीलें :" ७ तेव्हापासून उपाध्ये कमळाइसा या नावानेच सर्व गुरुकुल त्यांना संबोधू लागले. याप्रमाणे आचार्यांनीच त्यांना जानो उपाध्यांची शिष्या म्हणून विधिवत संबोधले.

त्यानंतर आचार्यांच्या आज्ञेनुसार उपाध्ये रावसगावी राहिले. तेथे कमळाइसांनी त्यांची शुश्रूषा केली. काही दिवसांनी उपाध्ये देवदर्शनाला गेले. स्मृतिस्थळातील उल्लेखाप्रमाणे 'मग कमळाइसीं बरवा नीक्षेपू केला :'८ त्या काळात एका स्त्रीने आपल्या गुरूचा अंत्यविधी व्यवस्थितपणे पार पाडावा, हे विशेषत्वाने नोंदवण्यासारखे आहे. त्यानंतर कमळाइसा पुन्हा भटोबासांपाशी आल्या. त्यांच्या आज्ञेप्रमाणे त्यांनी चुलत्याची म्हणजे गुरूंची मनोभावे सेवा केली. ज्ञान, भक्ती आणि सेवा यांचा त्रिवेणी संगम कमळाइसांच्या व्यक्तिमत्त्वात होता. पुढे सर्वज्ञ श्रीचक्रधरांची शिष्या साधा रावसगावला आल्याचा उल्लेख 'कमळाइसाचा वृद्धाचार' या प्रकरणात आला आहे. ९ त्यातील उल्लेखाप्रमाणे कमळाइसांनी साधाचीही चांगली सेवा केली. त्यानंतर साधाची बहीण जोमाइसे, त्यांचे पुत्र खेइदेव पंडित, त्यांचे परशरामबास रावसगावला आले. "साधासी भेटली : तवं साधासि देहावसान मांडलें : मग साधिं देहांति दाढेचा विसेंख आन : छिन्नस्थळि सातांतुलते : कमळाइसांसी दीधलि : इतुकेंनि तयाचें देहे अवसान जाले : मग प्रसरामबास थोर जाले : बाइदेवबासापाशी भिक्षा केली :" याचा अर्थ ही घटना श्रीनागदेवाचार्यांच्या नंतरची असल्याचे स्पष्ट होते. श्री. मुरलीधर महानुभाव कोळपकर यांनी त्यांच्या 'महानुभावांचा इतिहास' या ग्रंथात उपाध्ये गेल्यानंतर 'एवढ्यातच चक्रधरस्वामींची शिष्या फिरत फिरत रावसगावाला आली', असा उल्लेख केला आहे. १० हा उल्लेख त्यांनी 'भिष्माचार्यांचे अन्वयस्थळ' याच्या आधारे केल्याचे त्यांनी दिलेल्या संदर्भावरून दिसून येते. स्मृतिस्थळाच्या मागे दिलेल्या वृद्धाचारात ११ यासंबंधीचा जो उल्लेख आलेला आहे, त्यावरून साधाचे निधन आचार्यांच्या नंतरच झालेले आहे. अन्यथा हा उल्लेख स्मृतिस्थळातच आला असता. आचार्यांच्या नंतरचा पंथाचा इतिहास 'वृद्धाचारा'तून आलेला आहे. त्यामुळेच परशरामव्यास बाइदेवबासांपाशी अनुसरले, अन्यथा त्यांचे अनुसरण श्रीनागदेवचार्यांपाशीच झाले असते. याचा अर्थ श्री. मुरलीधर महानुभाव कोळपकर म्हणतात त्याप्रमाणे उपाध्ये गेल्यानंतर लगेच साधा रावसगावला गेल्या नसून, आचार्य गेल्यानंतर–अर्थात बऱ्याच काळाने– त्या रावसगावला गेल्याचे स्पष्ट होते.

यापूर्वी उल्लेख केलेल्या 'उपाध्ये आम्नायाच्या अन्वयस्थळा' त यासंबंधीचा व्यवस्थित तपशील दिला








आहे. उपाध्यांच्या निधनानंतर साहजिकच कमळाइसा आचार्यांकडे येणार. आणि तसेच झाले. त्या आचार्यांच्या सन्निधानी राहिल्या. त्यानंतर पुढे आचार्यांचे देहावसान झाले. "तदनंतरे भटोबासामागें माणिकेस्वरापासी चिंचगाव तेथिचे माहाजन नायेक : काइ नायेक ते भटोबासांचे सीक्षे : ते कमळाइसातें घाटावरी घेऊनि गेलें : मग ते दोघै कमळाइसांपासि आनुसरलें : मग कमळाइसें रावसगावासी आलि : तेथ राहीली :" या काळात साधाइसा तेथे आल्या असाव्या आणि त्यांचा देहान्त झाला असावा, असे दिसते. त्या वेळी त्यांनी आपल्याकडील देवपूजा परशरामव्यास व कमळाइसांना वाटून दिली. त्यात साधाइसांना श्रीगोविंदप्रभूंनी दिलेली प्रसादाची दाढ परशरामव्यासांना मिळाली. परशरामव्यास मोठे झाल्यावर ते आचार्य बाइदेवांपासी अनुसरले.

त्यानंतर कधीतरी आनोबास मुख्य करून परशराम-बासासी म्हणाले, की श्रीप्रभूंनी मार्गाच्या हेतू साधइसास दाढ दिली होती. साधाइसाने ती आपणास दिली आहे. "तरि तें भंगोनि आम्हासीं नमस्करावयां द्यावि :" त्याप्रमाणे दाढेच्या विशेषाचे दोन भाग केले. अर्धा भाग परशराम-व्यासांना मिळाला. अर्ध्याचे पुन्हा दोन भाग केले, आणि त्यांतील मोठा भाग कमळाइसांना दिला. अर्ध्या भागाचे पुन्हा दोन भाग केले. त्यांतील मोठा भाग आनोबासासी दिधला आणि लहान भाग कुमरा रेमाइसाला देण्यात आला. परशरामव्यासांनी आपला दाढेचा विशेष त्यांची शिष्या वाचा सुंदर बोल्हाइसा हिच्याजवळ दिलेला होता. खालसयाच्या धाडीत बोल्हाइसाला धरून नेण्यात आले. तिने तीन दिवस परिवारातील भिक्षुकांची वाट पाहिली. शेवटी अनुसरण भंगण्यापेक्षा आत्महत्या चांगली म्हणून विशेषासहित विहिरीत उडी मारली. परशरामव्यासांना याचे प्रचंड दु:ख झाले. कमळाइसांची भेट झाल्यावर त्यांनी ही दु:खद वार्ता त्यांना ऐकवली. त्या वेळी कमळाइसांनी शिष्या हिराइसाच्या गळ्यात ठेवलेला दाढेचा विशेष काढून परशरामव्यासांना दिला. कमळाइसांच्या मनाचा मोठेपणा येथे लक्षात घेण्यासारखा आहे.

परिवारप्रमुखाच्या ठिकाणी असणारा मनाचा मोठेपणा कमळाइसांच्या ठिकाणी नक्कीच होता; आणि म्हणूनच त्यांनी आपल्या अन्त्यसमयी देवपूजेचे व्यवस्थितपणे विभाजन केले. अन्वयस्थळकार लिहितात– "कमळाइसी देहावसानि : विभाग केले : कळापाची जुडी आन पंचवीस स्थंडिलें : हिराइसासी दीधली : साधांचि छिन्नस्थळी : आन नीरुक्तांची पोथीं : आन पंचवीस स्थंडिलें : पोमाइसासि दीधली : नखाचा वीसेंखू : आन पंचवीस स्थंडिलें : हारीदमुनिबासासि दीधली : फोडिसहीत विळीचा विसेंखू : आन पंचवीस स्थंडिलें : चौंडाइसाषी दीधली : पोफळफोडणा : आन पंचवीस स्थंडिलें : धानाइसासिं दीधली : वज्रि : आन पंचवीस स्थंडिलें : भायाबासासी दीधली : ऐसे विभाग केलें :।। छ।।"[१२] अशा रीतीने उपाध्ये आम्नायप्रवर्तक कमळाइसांनी आपल्याकडे असलेल्या देवपूजेची व्यवस्था लावली. महानुभाव तत्त्वज्ञानातील "एथिचेया संबंधा गेले तेतुले ओटेगोटे आदिकरुनि तुम्हां नमस्करणीएं कीं गा :"[१३] या सूत्राप्रमाणे श्रीचक्रधरस्वामींच्या स्पर्शाने पवित्र झालेल्या सर्वच वस्तू महानुभावांना वंदनीय असतात. उपरिनिर्दिष्ट देवपूजेत पाषाण, लोखंड, नख, केस, वस्त्र इत्यादींचा समावेश आहे. कमळाइसांनी काळजीपूर्वक त्या नमस्कारी वस्तू आपल्या शिष्यांना दिल्या. परिवारातील सर्व शिष्यांना त्या समानतेची वागणूक देत असत, हे या उल्लेखावरूनही स्पष्ट होते. परशरामव्यासांनी दिलेला दाढेचा विशेषही त्यांनी याआधीच परशरामव्यासांना परत केला होता. आपल्या सर्व शिष्यांना देवपूजा देण्याची ही घटना जेजुरीजवळील खळदी या गावी घडली. कारण अन्त्यसमयी कमळाइसा जेजुरीजवळील खळदीला असल्याचा उल्लेख 'महानुभावांच्या अन्वयस्थळा'त आलेला आहे.

कमळाइसादेखील इतर महानुभावांप्रमाणेच आपल्या परिवारासह भटकंती करीत असायच्या. तरीही आचार्यांच्या नंतर त्यांच्या शिष्यांच्या आग्रहाने कमळाइसांचे वास्तव्य रावसगावीच अधिक होते, असे दिसून येते. रावसगाव व त्या परिसरातील श्रीनागदेवाचार्यांचा शिष्यपरिवार मोठा होता. जालन्यापासून पंचावन्न किलोमीटर अंतरावर असणाऱ्या रावसगावाला (रामसगाव) आचार्यांचे जाणे-येणे असल्याचा उल्लेख 'स्मृतिस्थळा'त आलेला आहे. आचार्यांचा हा परिवार पुढे कमळाइसांना गुरू करून त्यांच्या नावे संन्यासदीक्षा घेत होता. त्यात राजुर लक्ष्मिइंद्र






भट, हरीदेवमुनी, हरीभागवत, पंडित केसोबा, विरक्त केसोबा इत्यादी मुख्य करून साठ शिष्य कमळाइसास अनुसरल्याची नोंद आहे. याचा अर्थ श्रीपरशरामव्यासांच्या हयातीतच कमळाइसांचा शिष्यपरिवार वाढू लागला होता. श्रीनागदेवाचार्यांच्या शिष्यपरिवाराने कमळाइसांच्या नावे संन्यास घेणे, यावरून कमळाइसांच्या ज्ञानाविषयी, त्यांच्या आचरणाविषयी श्रीनागदेवाचार्यांच्या परिवारात समाधान होते, ही महत्त्वाची गोष्टही स्पष्ट होते. आचार्यांकडून कानमंत्र घेतलेल्या त्यांच्या शिष्यांनी एका स्त्रीला गुरू करून संन्यास घ्यावा, ही गोष्ट नोंद करण्यासारखी आहे. आचार्यपदी असणाऱ्या परशरामव्यासांचीही याला मान्यता असावी, असे दिसते. कारण त्यांनी याला विरोध केल्याची नोंद कोठेही दिसत नाही. कमळाइसांचे श्रेष्ठत्व आणि त्यांचा अधिकार हा सर्वांनाच मान्य होता, हे यावरून लक्षात येते.

खालसयाची धाड पडल्यावर महानुभाव संतांची वाताहत झाली. त्यात अनेकजण वेगवेगळ्या दिशांनी व वेगवेगळ्या ठिकाणी पांगले गेले. या वाताहतीतच कमळाइसा जेजुरीजवळील वाल्हा या गावी आल्या. तेथे त्यांनी मठ केला. तेथील श्रीनागदेवाचार्यांच्या महाजनादी शिष्यांनी कमळाइसांची सेवा केली. त्या प्रांतातील लोक त्यांना "वाल्होकर कमळाइसें : ऐसे म्हणति :" असा उल्लेख 'उपाध्ये आम्नायाच्या अन्वयस्थळा'त (महानुभवांची अन्वयस्थळे, पृ. १२१) आलेला आहे. वाल्ह्याला त्यांनी किती दिवस मुक्काम केला, याची नोंद दिसत नसली, तरी वाल्ह्याला त्यांनी मठ केल्यामुळे आणि आचार्यांचा शिष्यपरिवार तेथे असल्याने त्यांनी बरेच दिवस तेथे मुक्काम केला असावा, असे वाटते. शेवटी वाल्ह्याचे राजनायक दिवंगत झाल्यावर 'खळदी' या गावी कमळाइसा गेल्याची आणि तेथेच त्यांचे देहावसान झाल्याची नोंद आहे. या कमळाइसा तेरा आम्नायांतील एका महत्त्वाच्या आम्नायाच्या प्रवर्तक ठरल्या. "तया कमळाइसापासुनि उपाध्याम्नाय प्रवर्तला :।। :" अशी नोंद 'उपाध्ये आम्नायाच्या अन्वयस्थळा'त [१४] आलेली आहे.

अशा विदुषी कमळाइसा उपाध्ये आम्नायाच्या प्रवर्तक ठरल्या. त्यांच्या प्रयत्नाने आम्नायाचा विकास झाल्याचे दिसून येते. कमळाइसा स्वतःच ज्ञानी आणि आचरणशुद्ध तपस्विनी होत्या. त्यांच्या आचरणाचा आदर्श त्यांच्या शिष्यपरिवारानेही घेतला होता. अन्वयस्थळकार लिहितात– [१५] "तयाचिं साटी शिक्षें : तयामाजि : चौपण।।५४।। सिक्षें : तयाची देहे झाडातळिं इश्वरूविरहें निमार्ली : सा जणें उरलि : तयापासौनि : उपाध्याम्नायें जाला : सा जणामाजि वडिलें हिराइसें :।१। : त्या धाकुटि पोमाइसें :।२। : त्या धाकुटी चौडाइसें :।३।: त्या धाकुटें हारिमुनिबास :।४। : त्या धाकुटे भायाबास :।५। : त्या धाकुटी धानाइसें :।६। : ये साही आचार्ये जालें :।।७।। :" या सहा जणांनाच त्यांनी आपल्या-जवळील सगळी सामग्री वाटल्याचे आपण पाहिले आहेच.

कमळाइसांच्या नंतर आचार्यपदी विराजमान होणाऱ्या या सहा प्रमुख शिष्यांमध्ये चार स्त्रिया व दोन पुरुष होते. याचा अर्थ पुढील काळात या चारही स्त्रिया आचार्यपदी विराजमान झाल्या आणि त्यांनी उपाध्ये आम्नायाचा परिवार सांभाळला. महानुभावांच्या तेरा आम्नायांमध्ये आजही तितक्याच ताकदीने उपाध्ये आम्नाय उभा आहे. याचे कारण ज्ञानतपस्विनी कमळाइसांचे तेज या आम्नायाला लाभले. स्त्रीसुद्धा अतिशय समर्थपणे पंथाची धुरा वाहू शकते, हे या आम्नायातील स्त्रियांनी सिद्ध केले आहे. "तुमचे जीव : मग यांचीया काइ जीऊलीया?" या सर्वज्ञांच्या उपरोधिक प्रश्नाचे उत्तर उपाध्ये आम्नायाच्या कर्तृत्वसंपन्न स्त्रियांच्या व्यक्तिमत्त्वात दिसते.

कमळाइसांच्या नंतर एकसंधी प्रज्ञावंत असणारी त्यांची शिष्या हिराइसा हिने आचार्य म्हणून परिवाराची जबाबदारी सांभाळली. संपूर्ण लीळाचरित्र मुखोद्‌गत असल्याने नव्याने लीळाचरित्राची बांधणी करताना हिराइसांची खूप मदत झाली. लीळाचरित्राचा हिराइसापाठ अजूनही महत्त्वाचा मानला जातो. उपाध्ये आम्नायाची ही देणगीही खूप महत्त्वाची ठरली. सकळ लिपीचे निर्माते 'सह्याद्रिवर्णन'कार रवळोबास हे याच आम्नायातील होत. पुढे महानुभावांनी चोवीस लिप्या निर्माण केल्या असल्या, तरी सकळा लिपी ही महानुभावांची पहिली लिपी होय, आणि ती उपाध्ये आम्नायानेच दिली. त्यानंतरच्या वज्रलिपी व सुंदरीलिपीचे कर्ते न्यायंबास हेही याच आम्नायातील होत. 'मुक्तमालिका', 'हेतुस्थळ' या महत्त्वाच्या ग्रंथांची

अनुक्रमणिका

निर्मितीही या न्यायंबासांनीच केलेली आहे. 'दर्शन-प्रकाश'कार मुरारीमल्ल, संस्कृत-प्राकृत ग्रंथरचना करणारे बोपदेवशिष्य भीष्माचार्य एवढेच नव्हे तर, पुढे पंथात जे चोवीस पक्षकार (तत्त्वज्ञानावर भाष्य करणारे भाष्यकार) महत्त्वाचे मानले गेले, त्यांत याच आम्नायाचे धारासिव ओंकारबास हे एक होते. 'ध्यानामृत-स्तोत्र', 'दृष्टान्तस्थळ' लिहिणारे विश्वनाथ बीडकर, 'लीलामृतसिंधुकार' दामोदर कवी, आचार, विचार, लक्षण, वचनसंबंध, लक्षणमहाभाष्य इत्यादी ग्रंथ लिहिणारे परशराम–हरिराज अशा अनेक ग्रंथकारांनी पंथीय वाङ्मयसेवा करून उपाध्ये आम्नायाच्या लौकिकात भरच घातली आहे. अर्थातच यामागे उपाध्ये आम्नायाच्या प्रवर्तक, पंथातील पहिल्या स्त्रीआचार्य ज्ञानतपस्विनी कमळाइसा यांचे समर्थ व्यक्तिमत्त्व होते, हे वेगळे सांगायला नको.

**संदर्भ आणि टिपा –**


१. स्मृतिस्थळ, संपा. डॉ. रमेश आवलगावकर, चंद्रकला प्रकाशन, पुणे १९९९, स्मृती क्र. ३५०.
२. भारत इतिहास संशोधन मंडळाचे त्रैमासिक, अंक १३.२.
३. महानुभावांची अन्वयस्थळे, संपा. डॉ.रमेश आवलगावकर, चंद्रकला प्रकाशन, पुणे, १९९६, पृ.९.
४. महानुभाव संशोधन : १, डॉ. वि. भि.कोलते, अरुण प्रकाशन, मलकापूर, १९६२, पृ.१२४.
५. लीळाचरित्र, संपा. डॉ. वि. भि. कोलते, महाराष्ट्र राज्य साहित्य-संस्कृती मंडळ, मुंबई, १९८२, उत्तरार्ध लीळा १०२.
६. महानुभावांची अन्वयस्थळे, उनि. पृ. १२०-१२१.
७. तत्रैव - पृ. १२१.
८. स्मृतिस्थळ, उनि. स्मृती क्र. २४९.
९. महानुभावांची अन्वयस्थळे, उनि. पृ. १२२.
१०.महानुभावांचा इतिहास, श्री मुरलीधर महानुभाव कोळपकर (लेखक व प्रकाशक), लातूर, १९७९, पृ.१६८.
११. स्मृतिस्थळ, उनि. वृद्धाचार क्र.३८
१२. महानुभावांची अन्वयस्थळे, उनि. पृ. १२७.
१३. लीळाचरित्र, उनि . उत्तरार्ध लीळा ६९.
१४. महानुभावांची अन्वयस्थळे, उनि. पृ. १२१.
१५. तत्रैव, पृ. १२४.






अनुक्रमणिका

# खाजगीकरण, शैक्षणिक शुल्क आणि गुणवत्ता

प्रा. डॉ. पंडितराव पवार

**प्रास्ताविक :**

विद्यार्थी, शिक्षक, चालक, पालक आणि शासन हे शिक्षणप्रक्रियेचे प्रमुख घटक आहेत. विद्यार्थी हा शिक्षणप्रक्रियेतील मध्यवर्ती आणि म्हणून महत्त्वाचा घटक आहे. त्याच्या सर्वांगीण विकासासाठी शिक्षणप्रक्रिया शासनाच्या माध्यमातून राबविली जाते. इंग्रज राजवटीत आणि स्वातंत्र्योत्तर काळातही शिक्षणाची ध्येये-उद्दिष्टे सुचविण्यासाठी विविध शिक्षण आयोग नेमले गेले. त्यांनी सुचविल्याप्रमाणे शैक्षणिक धोरणे आखून त्यांची कार्यवाही करण्यात आली. केंद्र आणि राज्य सरकारांच्या वेळोवेळी बदलणाऱ्या धोरणांची अंमलबजावणीही करण्यात आली. काही प्रयोग राबविण्यात आले, काही प्रयोग मागे पडले, हे सर्वज्ञात आहे.

एकंदर शिक्षणप्रक्रियेत, विशेषतः उच्च शिक्षणासाठी शासनस्तरावर पुरेसा निधी उपलब्ध केला जात नाही. भारतासारख्या विकसनशील देशात तर शिक्षण क्षेत्रावर भरीव खर्च करण्याची गरज असूनही दुर्दैवाने सहा-सात टक्क्यांच्या पुढे शिक्षणावर अद्यापही खर्च होत नाही. सर्वांना शिक्षण देणे आवश्यक असल्याने समानतेच्या (Equity) न्यायाने संख्यात्मकता (Quantity) वाढते आणि त्याचा परिणाम गुणवत्तेवर (Quality) होतो. ती गुणवत्ता राखणे भारतासारख्या देशात एक आव्हान आहे.

**खाजगीकरणाची सुरुवात :**

समाजातील आर्थिक दुर्बल घटकांतील अनेक बुद्धिमान विद्यार्थ्यांना शासकीय उच्चशिक्षण संस्थांत मर्यादित जागांमुळे प्रवेश मिळत नाहीत. त्यामुळे अनेक विद्यार्थी उच्च शिक्षणापासून वंचित राहतात. ही परिस्थिती महाराष्ट्र राज्याचे तत्कालीन मुख्यमंत्री कै. वसंतदादा पाटील यांच्याही ध्यानी आली. म्हणून त्यांनी १९८३ पासून खाजगीकरणाच्या माध्यमातून विनाअनुदान शिक्षण-प्रक्रियेला सुरुवात केली. शिक्षणातील खाजगीकरणाची तीच खरी नांदी आहे. देशपातळीवर १९९१ पासून नव्या आर्थिक धोरणाचा स्वीकार झाल्यावर शिक्षणविषयक खर्चात आणखी कपात करण्यास सुरुवात झाली. नंतरच्या कालावधीत म्हणजे २००१ – २००२ पर्यंत उच्च शिक्षणावरील खर्चात प्रतिविद्यार्थी २८ टक्क्यांनी कपात झाल्याचे शासनाच्या 'कॅबे' अहवालात स्पष्ट झाले आहे. त्याचा अपरिहार्य परिणाम म्हणजे जागतिक स्पर्धेच्या तुलनेत आपल्याकडेही शिक्षण एका विक्रीवस्तूच्या स्वरूपात ओळखले जाऊ लागले. शिक्षणाने उच्चशिक्षणाच्या क्षेत्रातून अंग काढून घ्यावे, असे बिर्ला-अंबानी अहवालाने सरकारला सुचविले. त्यातच 'गॅट' कराराची भर पडली. आणि या पार्श्वभूमीवर खाजगीकरण, त्यासाठी शुल्कनिश्चिती, शिक्षणाचे व्यापारीकरण यांसंबंधीचे प्रश्नही पुढे आले. खाजगीकरणातून जास्तीत जास्त विद्यार्थ्यांना उच्चशिक्षणाची संधी मिळून गुणवत्ताही टिकविणे शक्य होईल, असा विचार शासन आणि संस्थाचालक यांना भावणारा होता. वैद्यकीय, अभियांत्रिकी, औषधनिर्माणशास्त्र, वास्तुशास्त्र, शिक्षणशास्त्र, पदवी--पदविका अभ्यास इत्यादी व्यावसायिक अभ्यासक्रमांच्या शुल्कनिश्चितीचा प्रश्न साधारणतः १९९३ साली चर्चेचा विषय ठरला.

**शैक्षणिक शुल्कनिश्चिती समिती :**

उन्नीकृष्णन प्रकरणी सर्वोच्च न्यायालयाने दिलेल्या निर्णयानुसार खाजगी महाविद्यालयांना गुणवत्तेनुसार प्रवेश देणे बंधनकारक करून कॅपिटेशन फीवर बंदी आणण्यात आली. या निर्णयामुळे सर्वच खाजगी व्यावसायिक संस्थांत केंद्रीय पद्धतीने प्रवेशप्रक्रिया सुरू होऊन आर्थिक दुर्बल स्तरातील गुणवान विद्यार्थ्यांनाही खाजगी महाविद्यालयात प्रवेश मिळणे सुलभ झाले. पुढे या पद्धतीतही काही अडचणी निर्माण झाल्या. त्यामुळे सन २००२ मध्ये टी. एम. पै फाउंडेशन प्रकरणी सर्वोच्च न्यायालयाने वरील निर्णय बदलला. सुधारित निर्णयानुसार 'मेरिट फ्री सीट' आणि 'पेमेंट सीट' ही योजना रद्द होऊन खाजगी महाविद्यालयांना खर्चावर आधारित शुल्करचना ठरवून

घेण्याचे अधिकार मिळाले. परंतु त्यातही संस्थाचालकांनी आपणास हवे त्याप्रमाणे शुल्क घेण्याचे धोरण अवलंबल्याने गोंधळात भर पडली. त्यामुळे अनेक पालकांना आवश्यक ते शुल्क भरणे अशक्य होऊ लागले. पुन्हा गुणवंत आर्थिक दुर्बल स्तरातील विद्यार्थी उच्च शिक्षणापासून दूर फेकले जाऊ लागले. म्हणून महाराष्ट्र शासनाने २००३ साली राज्यातील उच्च तंत्रशिक्षण व वैद्यकीय विभागांतर्गत येणाऱ्या सर्व खाजगी अभ्यासक्रमांचे शुल्क ठरविण्यासाठी 'शिक्षण शुल्क समिती' आणि गुणवत्तेवर आधारित प्रवेशांवर नियंत्रण ठेवण्यासाठी 'प्रवेश नियंत्रण समिती' अशा दोन समित्या गठित केल्या.

संस्थेने घेतलेल्या प्रवेशपरीक्षेवर लक्ष ठेवून प्रवेश-प्रक्रिया पारदर्शीपणे पार पाडण्यासाठी नियंत्रण ठेवणे, हेच प्रवेश नियंत्रण समितीचे प्रमुख कार्य आहे. सन २००२ पासून सर्व व्यावसायिक शैक्षणिक संस्थांतील 'समान शुल्क' पद्धत बंद होऊन संस्थेतील किंवा महाविद्यालयातील एकंदर भौतिक सुविधा पाहून शुल्क निश्चित करण्याची योजना शासनाने निश्चित केली. त्यानुसार शुल्करचनेचे सूत्र ठरविणे, महाविद्यालयांचे शुल्कांसंबंधीचे प्रस्ताव तपासून ते प्रमाणित करणे आणि जाहीर करणे हे शिक्षण शुल्क समितीचे प्रमुख काम ठरले. या योजनेनुसार सर्व व्यावसायिक-खाजगी संस्थांतील शुल्कनिश्चितीचे प्रस्ताव दरवर्षी तपासून शुल्क निश्चित केले जाते. सन २०११-१२ पासून सर्वसाधारणपणे साडेसात टक्के वाढ गृहीत धरून पुढील वर्षासाठी तात्पुरते शुल्क प्रथम जाहीर करून प्रवेशप्रक्रियेला सुरुवात होते. त्यानंतर महाविद्यालयांच्या भौतिक सुविधांची तपासणी करून अंतिम शुल्क निश्चित केले जाते. या शैक्षणिक शुल्कांचे तपशील पालकांसाठी-समाजाच्या माहितीसाठी संकेतस्थळावरही जाहीर केले जातात.

**शैक्षणिक शुल्क आणि गुणवत्ता यांचा परस्परसंबंध**

शैक्षणिक गुणवत्तेत भौतिक गुणवत्ता आणि शैक्षणिक गुणवत्ता असे ढोबळ मानाने दोन प्रकार मानता येतील.

◆ **भौतिक गुणवत्ता :**

भौतिक गुणवत्तेत प्रामुख्याने शैक्षणिक संस्थेने पुरविलेल्या विविध प्रयोजननिहाय इमारतींचा आणि त्यांतील सुविधांचा समावेश करता येईल. प्रशस्त वर्गखोल्या, विविध विषयांच्या ग्रंथांनी आणि नियतकालिकांनी समृद्ध असे ग्रंथालय, अद्ययावत आणि दर्जेदार प्रयोगशाळा, देशी-विदेशी खेळांसाठी क्रीडांगण, विद्यार्थ्यांच्या सुप्त गुणांना वाव देण्यासाठी आणि आपले कलागुण सादर करण्यासाठी भव्य असे सभागृह, पुरेशी स्वच्छतागृहे इत्यादींचा समावेश होऊ शकतो. विद्यार्थ्यांच्या प्रात्यक्षिकांसाठी आधुनिक संगणक, लॅपटॉप, एल.सी.डी., दूरचित्रवाणी, प्रोजेक्टर व इंटरनेट यांसारख्या अद्ययावत उपकरणांनी व सुविधांनी संपन्न असलेल्या प्रयोगशाळा यांची उपलब्धी हीदेखील भौतिक गुणवत्तेचे निदर्शक आहे. या भौतिक सुविधांची गुणवत्ता पाहूनच शैक्षणिक शुल्कनिश्चिती होणे अपेक्षित आहे.

◆ **शैक्षणिक गुणवत्ता :**

समाजविकासाची व्यापक उद्दिष्टे साध्य करणारा, विद्यार्थी-विकासाला पूरक ठरणारा अभ्यासक्रम हा शैक्षणिक गुणवत्तेचा गाभा आहे. या अभ्यासक्रमाचा एकंदर आशय, तो विद्यार्थ्यांपर्यंत पोचविण्याच्या पद्धती आणि त्या अभ्यासक्रमाच्या आधारे विद्यार्थ्यांचे करावयाचे मूल्यमापन म्हणजेच परीक्षापद्धती हे शैक्षणिक गुणवत्ता मोजण्याचे प्रमुख साधन आहे. खरेतर अभ्यासक्रम (Curriculum ) या शब्दाचा शब्दशः अर्थ ब्रबेचर या शिक्षणतज्ज्ञाच्या मते शर्यतीचे मैदान होय. त्यांच्या शब्दांत सांगायचे तर, 'It is a runway. A course which one runs to reach a goal, a course of study'. म्हणजेच ध्येयप्राप्तीसाठी जो विद्यार्थी धावतो, जो विशेष प्रकारचा अभ्यास करतो, त्याच्यासाठी अभ्यासक्रम ही विद्येची शर्यतच आहे.

आज जागतिकीरणाच्या युगात सर्वच क्षेत्रांत स्पर्धा सुरू आहेत. समाजाच्या गरजा काळाच्या ओघात सारख्या बदलू लागल्या आहेत. अशा गतिमान युगात यशस्वी होण्यासाठी अभ्यासक्रमाची उद्दिष्टेही दूरदृष्टीने आखणे क्रमप्राप्त आहे. 'गॅट' करारानुसार विद्यार्थी हासुद्धा संस्थाचालकांच्या दृष्टीने सुरुवातीला ग्राहकच आहे. त्याची गुणवत्ता सिद्ध झाल्यावर इतर सेवा किंवा वस्तूंप्रमाणेच तोही वितरणयोग्य उत्पादन (Product) ठरला आहे.

**शैक्षणिक गुणवत्तेत अभ्यासक्रमाचे स्थान :**

जागतिकीकरणातील खाजगीकरण आणि उदारी-










करणाच्या या काळात खाजगी विद्यापीठे, परदेशी विद्यापीठे यांनी पारंपरिक विद्यापीठांना गुणवत्तेचे आव्हान दिलेले आहे. म्हणून शैक्षणिक गुणवत्तेनुसार बौद्धिक उत्पादन (गुणवंत विद्यार्थी) यास अधिक मागणी मिळण्यास वाव आहे. विद्यार्थ्यांना शैक्षणिक शुल्काच्या मोबदल्यात शिक्षण मिळाले नाही, तर असा विद्यार्थी ग्राहक पंचायत किंवा न्यायालयातही दाद मागू शकतो. याचाच अर्थ भौतिक सुविधा आणि शैक्षणिक गुणवत्ता राखण्यासाठी विहित केलेला अभ्यासक्रम राबवणारे, उच्च शैक्षणिक पात्रताधारक असे शिक्षक नेमणे शैक्षणिक संस्थांवर बंधनकारक आहे. कोणत्याही देशाचा विकास उच्च-शिक्षणाचा व्यापक परिघ आणि त्याची निःसंशय गुणवत्ता यांवर अवलंबून असतो. 'गॅट' करारानुसार शासकीय शैक्षणिक अनुदानात कपात होत असून अशाही परिस्थितीत शैक्षणिक संस्थांनी निकोप स्पर्धा ठेवून गुणवत्तावाढ करणे अपेक्षित आहे. त्यासाठी समाजाच्या गरजा ओळखून समाजातील सर्वच घटकांची अपेक्षापूर्ती करणारा अभ्यासक्रम विद्यापीठांच्या चौकटीत राहून आपल्या संस्थेतील विद्यार्थ्यांना पुरविणे, ही संस्थाचालकांचीच जबाबदारी आहे. विद्यापीठपातळीवर काम करणाऱ्या शिक्षकांनी विद्यार्थ्यांच्या चौफेर व्यक्तिमत्त्वविकासाला पूरक ठरेल, अशा अभ्यासक्रमाची आखणी करण्यासाठी सजग राहणे आवश्यक आहे. पारंपरिक आणि साचेबंद अभ्यासक्रमाला बाजूला सारून जागतिक संशोधनामध्ये विद्यार्थ्यांचा कल वाढेल, असा अभ्यासक्रम देण्याची गरज आहे. खाजगीकरणातील शैक्षणिक संस्थांची गुणवत्ता केवळ देशपातळीवरच महत्त्वपूर्ण ठरणार नाही, तर स्थानिक आणि वैश्विक पातळीवरसुद्धा हे शैक्षणिक गुणवत्तेचे निकष लावल्यास अशी गुणवत्ता शैक्षणिक संस्थेचे मानांकन वाढण्यास कारणीभूत ठरेल.

**गुणवत्तापूर्ण शिक्षक :**

युगधर्मानुसार शास्त्रीय पायावर आखलेल्या अभ्यासक्रमाबरोबरच गुणवत्तावाढीसाठी आणि उत्कृष्ट अध्यापनपद्धती राबविण्यासाठी उच्च शैक्षणिक पात्रताधारक शिक्षक संस्थेत नेमणे आवश्यक आहे. परिस्थितिशरण म्हणून शिक्षणव्यवसायाकडे आलेल्या व्यक्तीपेक्षा अध्यापनशील व्यक्तिमत्त्व असलेल्या शिक्षकांची आज नितान्त गरज आहे. जो शिक्षक आपल्या विषयात स्वयंप्रज्ञ आहे आणि ज्याने अध्यापनशास्त्राचे ज्ञान आत्मसात केले आहे, असा शिक्षकच विद्यार्थ्यांचे व्यक्तिमत्त्व घडविणारा उर्जास्रोत ठरू शकतो. शिक्षकाचे एकूणच वाचनाचे क्षेत्र, त्याचा विषयज्ञानाचा आवाका, आपल्या विषयासंबंधी वेळोवेळी केलेले लेखन, हे शैक्षणिक गुणवत्तावाढीस प्रभावी ठरणारे घटक आहेत. त्याचप्रमाणे शिक्षकाचे अल्पकालीन प्रशिक्षण, त्याने दृक्‌श्राव्य अशा शैक्षणिक माध्यमांची केलेली निर्मिती, त्यांचा प्रभावी वापर, त्यातून विद्यार्थ्यांना सतत कार्यप्रवण करण्याची त्याची प्रवृत्ती, विद्यार्थ्यांमध्ये घडवून आणलेली गटचर्चा, त्याने तयार केलेले संशोधनप्रकल्प, या सर्व बाबी विद्यार्थि-विकासाच्या दृष्टीने शैक्षणिक गुणवत्तेला पोषक ठरणाऱ्या आहेत. शिक्षकाच्या एकंदर कामकाजाचे प्राचार्य आणि संस्थाचालक यांच्याकडून केले जाणारे मूल्यमापन आणि त्याच्या शैक्षणिक योग्यतेनुसार त्याला द्यावयाचे वेतन हेदेखील शैक्षणिक गुणवत्तावाढीच्या दृष्टीने आवश्यक घटक आहेत. २१ वे शतक हे ज्ञानाचे शतक म्हणून सर्वमान्य झाले आहे. त्यानुसार आजच्या शिक्षकाला आपली भूमिकाही त्या दिशेने बदलावी लागेल. वस्तुनिष्ठ अध्यापनापेक्षा रचनात्मक बाबीकडे शिक्षकाला वळावे लागेल. केवळ आपल्या विषयात तज्ज्ञ असून आता चालणार नाही, तर विद्यार्थ्यांच्या व्यक्तित्वाचे विविध आयाम समर्थ करण्याबरोबरच जीवनदर्शी मार्गदर्शकाची भूमिकाही शिक्षकाला जाणीवपूर्वक निभवावी लागेल. म्हणून केवळ ज्ञानाचा वाहक म्हणून न राहता, विधायक स्वरूपाच्या ज्ञानाच्या बांधणीची जबाबदारीही आजच्या शिक्षकावर आहे. म्हणून शैक्षणिक गुणवत्तावाढीसाठी संपूर्ण वर्गाला अध्यापन करताकरताच विद्यार्थ्यांच्या व्यक्तिगत विकासाकडेही त्याला लक्ष देण्याची गरज आहे. शैक्षणिक गुणवत्तावाढीत शिक्षकाची ही भूमिका अतिशय महत्त्वाची आहे.

**शैक्षणिक गुणवत्ता आणि मूल्यमापनपद्धती :**

कोणत्याही शिक्षणप्रक्रियेत विद्यार्थ्यांचे मूल्यमापन म्हणजेच त्याची परीक्षा हे प्रमुख माध्यम आहे. प्राप्त केलेल्या ज्ञानातून विद्यार्थ्यांच्या व्यक्तित्वाचे आणि बौद्धिकतेचे अवलोकन करून त्याची जीवनातील विविध

प्रश्नांना सामोरे जाण्याची सिद्धता तपासणे, हेच कोणत्याही मूल्यमापनपद्धतीचे प्रमुख उद्दिष्ट असते. या मूल्यमापनात लेखी-मौखिक परीक्षा, प्रकल्पअहवाल, क्षेत्रीय अभ्यास, गटचर्चा, मुक्त पुस्तक परीक्षापद्धती (Open book system) इत्यादी प्रकारांतून विद्यार्थ्यांची शैक्षणिक गुणवत्ता तपासणे आवश्यक असते. यालाच 'Qualitative Teaching Learning Revaluation' म्हटले जाते.

सध्या प्राथमिक स्तरावर आनंददायी शिक्षण होण्यासाठी परीक्षाविरहित असे सर्वंकष सातत्यपूर्ण मूल्यांकन आणि आकारिक मूल्यमापन या पद्धती स्वीकारल्या गेल्या आहेत. या पद्धतींची फलश्रुती अद्याप ठळक स्वरूपात दिसत नसली, तरी तेही एक शैक्षणिक गुणवत्ता तपासण्याचे माध्यमच आहे. मात्र अलीकडेच केंद्र सरकारने जाहीर केलेल्या 'ॲन्युअल स्टेटस ऑफ एज्युकेशन रिपोर्ट' (असर) नुसार प्राथमिक शिक्षणातील गणित, भाषा इत्यादी विषयांतील गुणवत्ता फारशी समाधानकारक नसल्याचे स्पष्ट झाले आहे. त्यामुळे प्राथमिक शिक्षणाच्या गुणवत्तावाढीसाठी आणखी काही पावले शासनास उचलावी लागतील, हे स्पष्ट होते.

आजच्या उच्च शिक्षणातील पारंपरिक परीक्षापद्धतीत अनेक दोष अनुभवास येतात. ही परीक्षा केवळ स्मरणशक्तीला महत्त्व देणारी असून विशिष्ट वेळेचे बंधनही असल्यामुळे विद्यार्थ्यांचे सर्वांगीण मूल्यमापन होऊ शकत नाही. शिक्षकाची मूल्यमापन करण्याची व्यक्तिनिष्ठता आणि काही अपवाद वगळल्यास मूल्यमापनात गांभीर्याचा अभावही दिसून येतो. विद्यार्थ्यांचा आयत्या वेळचा अभ्यास, त्यासाठी वापरलेले शॉर्ट कट्स, कॉपी करण्याची प्रवृत्ती या दोषांचाही अंतर्भाव होत असल्याने या परीक्षापद्धतीतून गुणवत्तापूर्ण मूल्यमापन करण्यात अडचणी येतात. त्यासाठी परीक्षापद्धतीत कालानुरूप बदल होणे, हेदेखील आता क्रमप्राप्त झालेले आहे.

**शैक्षणिक संस्थेचे एकूण गुणवत्तापूर्ण मूल्यमापन :**

कोणत्याही शिक्षणसंस्थेची एकंदर गुणवत्ता ही त्या शैक्षणिक संस्थेने समाजमानसात निर्माण केलेली विश्वासार्हतेवर अवलंबून असते. त्या संस्थेने चारित्र्यसंपन्न नागरिक आणि समाजहिताच्या कामात झोकून देणारे आदर्श घटक किती निर्माण केले, हेही त्या संस्थेच्या गुणवत्तेचे द्योतक आहे. राज्य, देश आणि जागतिक पातळीवर विविध कलाक्षेत्रांतील कलावंत, समाजाभिमुख प्रशासक, वैज्ञानिक दृष्टी विकसित करणारे शास्त्रज्ञ, देशाला अभिमान वाटेल असे क्रीडापटू, सामाजिक बांधिलकीने काम करणारे आदर्श शिक्षक इत्यादींची निर्मिती ही कोणत्याही शैक्षणिक संस्थेने समाजाला दिलेली देणगी असते. म्हणून शैक्षणिक संस्थेने पुरविलेल्या भौतिक सुविधांमधील गुंतवणूकच उद्याच्या समाजासाठी एकप्रकारची संचित ठेव असते. संचित ठेवीतून जसे व्याजातून व्याज मिळते, त्याचप्रमाणे भौतिक सुविधांतील गुंतवणुकीतून गुणवत्ताच वाढीस लागते. संस्थाचालकांची भूमिका म्हणजे शैक्षणिक गुणवत्तेची नांदीच म्हटली पाहिजे. भौतिक सुविधा उभारताना संस्थाचालकांना मात्र खूप अग्निदिव्यातून जावे लागते. परंतु शैक्षणिक गुणवत्ता हाच ध्यास असलेल्या संस्था कोणतीही तडजोड न स्वीकारता सर्व सोपस्कार पार पाडीत असतात.

शैक्षणिक गुणवत्तेसंबंधी 'नॅक'च्या कार्यकारी समितीचे अध्यक्ष प्रा. गोवर्धन मेहता यांनी पुणे विद्यापीठाच्या १०५ व्या पदवीदान समारंभात व्यक्त केलेले विचार मननीय आहेत. 'गुणवत्ता हे ध्येय नसून एक प्रवास आहे. तो प्राप्त करण्यासाठी विद्यापीठासोबतच विद्यार्थ्यांनीही सातत्याने प्रयत्नशील राहायला हवे. देशातील गुंतागुंतीच्या परिस्थितीत नव्या पिढीने आपल्या सामाजिक जबाबदाऱ्या समजून घेण्याची गरज आहे. त्यासाठी कौशल्ये आणि शिक्षण यांचा योग्य समन्वय घडवून आणणे आवश्यक आहे. ही बाब रोजगार, उद्योजकविकास, ज्ञान आणि संपत्तीच्या निर्मितीसाठी आवश्यक आहे. सोबतच शिक्षणव्यवस्थेमध्येही लवचीकता असण्याची गरज आहे. आजच्या काळात लिबरल शिक्षणाच्या पर्यायाचाही विचार करायला हवा. ठोकळेबाज शिक्षण-व्यवस्थेतून बाहेर येत विद्यार्थ्यांनी आंतरविद्याशाखीय शिक्षणव्यवस्थेचाही विचार करण्याची गरज आहे.' प्रा. मेहता यांच्या वरील विचारातून व्यापक शैक्षणिक गुणवत्तेची भूमिका अधिक स्पष्ट होते.

**खाउजांचा प्रभाव :**

शैक्षणिक शुल्क विनिमयावर खाजगीकरण,






उदारीकरण आणि जागतिकीकरणाचा प्रचंड प्रभाव पडलेला आहे. इतर क्षेत्रांप्रमाणेच शैक्षणिक क्षेत्रातही खाजगीकरणामुळे चांगला विकास होईल, अशी शासनाची धारणा असल्याने त्यासाठी शैक्षणिक संस्थांना प्रोत्साहनही देण्यात आले. पण जागतिकीकरणाच्या स्पर्धेत खाजगीकरणातून शैक्षणिक गुणवत्ता मागे पडून शिक्षणातही व्यापारी वृत्ती येऊ लागल्याची चिन्हे दिसल्याने शैक्षणिक शुल्क आणि त्याचा गुणवत्तेशी संबंध जोडण्याची प्रक्रिया शासनस्तरावर सुरू झाली. मोठ्या प्रमाणावर फी घेऊनदेखील संस्थाचालकांनी आवश्यक सुविधा न पुरविणे ही एक प्रकारची ग्राहकांची पिळवणूकच ठरते. अशाही परिस्थितीत शैक्षणिक गुणवत्तेला प्राधान्य देणाऱ्या काही चांगल्या शैक्षणिक संस्थांनी शैक्षणिक गुणवत्तेला दुय्यम स्थान दिलेले नाही. त्यामुळेच अशा संस्थांचे प्रवेश लगेच पूर्ण होतात. विश्वासार्हता आणि पारदर्शकता हेच कोणत्याही चांगल्या संस्थेच्या गुणवत्तेचे निदर्शक ठरतात.

**शैक्षणिक गुणवत्तेसाठी नियंत्रण आवश्यक :**

गेल्या तीन दशकांत उच्च आणि तंत्रशिक्षणाच्या क्षेत्रात संख्यात्मक वाढ पुष्कळ झालेली आहे. परंतु तरीही हुशार पण आर्थिक दृष्ट्या दुर्बल विद्यार्थी या उच्चशिक्षणापासून वंचित राहत आहेत; तर दुसरीकडे काही शिक्षणमहर्षींचे शिक्षणसम्राटांत रूपांतर झाले आहे. त्यामुळे शैक्षणिक गुणवत्ता हळूहळू मागे पडून नफेखोरीस वाव मिळत आहे, असेही काही समाजातील सुज्ञ घटकांना वाटू लागले आहे. त्यामुळे अनेक गरजू विद्यार्थी, पालक पिळले जात आहेत. मात्र काही संस्थाचालक विद्यार्थ्यांकडून नियमानुसार शैक्षणिक शुल्क घेऊन त्याचा शैक्षणिक गुणवत्तेसाठी पुरेपूर उपयोग करीत आहेत. काही आर्थिक दुर्बल विद्यार्थ्यांना सोयी-सवलती देऊन उच्चशिक्षणाच्या प्रवाहात आणण्याचे महत्कार्य करीत आहेत. परंतु काही तथाकथित संस्थाचालक विद्यार्थ्यांकडून शैक्षणिक शुल्क समितीने ठरवून दिलेली फी वसूल करण्यासाठी आपल्या शैक्षणिक संस्थेची आकर्षक जाहिरातबाजी करून गुणवत्तापूर्ण शिक्षण देण्यासंबंधी आश्वासनेही देतात. परंतु विद्यार्थी-पालक यांचा अपेक्षाभंग होतो. म्हणून अशा गैरप्रकारांना आळा घालण्यासाठी आणि संस्थांवर नियंत्रण ठेवण्यासाठी केंद्र सरकार पुन्हा कायदा आणू पाहत आहे.

**समारोप :**

आपल्या देशाला शिक्षणाची प्राचीन परंपरा आहे. गुरुकुल पद्धतीत उदात्त जीवनमूल्यांचे आणि ध्येयाशी बांधिलकी असणारे शिक्षण दिले जात होते. आजही समाजभान आणि राष्ट्रीय बांधिलकी जपणारे विद्यार्थी निर्माण करणाऱ्या काही शिक्षणसंस्था आहेत. परंतु अशा संस्था आणखी वाढण्याची गरज आहे. बदलत्या समाजाच्या विकासासाठी डोळस सिंहावलोकन करून उच्च शिक्षणाची गुणवत्ता वाढण्यासाठी संस्थाचालकांसह सर्व घटकांनी झोकून दिले, तर शैक्षणिक गुणवत्ता दूर नाही. आणि असे झाले तर खाजगीकरणातील पारदर्शकता आणि विश्वासार्हता समाजविकासाला उपयुक्त ठरेल, यात शंका नाही.



# महापूर आपत्ती व्यवस्थापन : राष्ट्रीय कार्य आणि कर्तव्य

डॉ. भगवान माने

**प्रस्तावना :**

मानवी जीवनाचा **इतिहास** हा संघर्षाचा इतिहास आहे. निसर्ग ही मानवाला मिळालेली देणगी असून, निसर्गाकडून तो बरेच काही ज्ञान घेत आहे. हजारो वर्षांच्या मानवी उत्क्रांतीच्या अवस्थेत मानवाने निसर्गाशी समायोजन करीत आपत्तींवर मात केली आहे. कारण इतर प्राण्यांपेक्षा मानवाने निरीक्षण, तर्क, विचार, कल्पना, बुद्धी, स्मरण, अनुमान, कारणमीमांसा या मनोव्यापारांचा आधार घेतला. प्राचीन काळात नैसर्गिक आपत्तींकडे दैवी कोप म्हणून पाहिले जात असे; परंतु आधुनिक काळात विज्ञान-तंत्रज्ञान आणि वैज्ञानिक दृष्टिकोनामुळे आपत्तींकडे नैसर्गिक किंवा मानवनिर्मित घटना म्हणून पाहिले जाते. आपत्तीचे स्वरूप वैश्विक आहे.

**आपत्तीची ऐतिहासिक पार्श्वभूमी :**

प्रामुख्याने आपत्ती ही नैसर्गिक आणि मानवनिर्मित असते. ६ ऑगस्ट १९४५ रोजी अमेरिकेने जपानमधील हिरोशिमा शहरावर टाकलेला फॅटमॅन अणुबॉंब; १९५६ मध्ये जपानमध्ये मिथाईल मर्क्युरीची विषबाधा झाल्याने हजारो लोकांचा झालेला मृत्यू; १९६७ ते १९७५ च्या व्हिएतनाम युद्धात अमेरिकेने जंगलातून 'एजंट ऑरेंज' या वनस्पतिनाशक विषारी द्रव्यांचा केलेला वापर; १९७० मध्ये बांगला देशातील चक्री वादळात पाच लाख लोकांचा झालेला मृत्यू; भारतात मध्यप्रदेश भोपाळ येथे बुधवार दिनांक ३ डिसेंबर १९८४ रोजी युनियन कार्बाईड या अमेरिकन बहुउद्देशीय कंपनीच्या जंतुनाशके बनविणाऱ्या प्रकल्पातून मेथील आयसोसायनेट (एम. आय. सी.) या विषारी वायुगळतीमुळे दोन हजार पाचशे लोकांचा मृत्यू आणि दहा हजारांपेक्षा अधिक लोकांना झालेली विषबाधा व अपंगत्व; तसेच २६ एप्रिल १९८६ रोजी सोव्हिएट युनियनच्या युक्रेन प्रांतातील चेर्नोबेल अणुभट्टीतील स्फोटामुळे एक लाख एकतीस हजार चौरस किलोमीटरचे क्षेत्र प्रदूषित झाले, हजारो लोकांना प्राण गमवावे लागले; २४ मार्च १९८९ रोजी अमेरिकेचे 'एक्झान वालडेझ' तेलवाहू जहाज फुटल्यामुळे एक कोटी गॅलन क्रूड ऑईल तीन हजार चौरस मैल समुद्रक्षेत्रावर पसरले; ३० सप्टेंबर १९९३ रोजी ६.४ रिश्टर स्केलच्या भूकंपामुळे लातूर, उस्मानाबाद जिल्ह्यात आठ हजार लोकांचा मृत्यू झाला आणि अकराशे कोटी रुपयांची मालमत्ता नष्ट झाली; २६ जानेवारी २००० रोजी गुजरातमध्ये ६.९ रिश्टर स्केलच्या भूकंपाने भूज, मोरवी, अहमदाबाद येथे वीस हजार लोक मृत्युमुखी पडले; अमेरिकेत ११ सप्टेंबर २००१ रोजी वर्ल्ड ट्रेड सेंटर, आणि पेंटागॉनवर दहशतवादी हल्ला झाल्यामुळे मनुष्य आणि वित्तहानी मोठ्या प्रमाणावर झाली; २६ डिसेंबर २००४ च्या त्सुनामी लाटांमुळे इंडोनेशिया आणि दक्षिण भारताच्या किनारपट्टीवर मानवी हाहाकार उडाला, असंख्य लोकांचा त्सुनामी लाटेने बळी घेतला. २६ जुलै २००५ रोजी मुंबई येथे आणि राज्यात महाजलप्रलय होऊन हजारो लोकांचा बळी घेतला. तसेच २६ नोव्हेंबर २००८ रोजी मुंबई शहरावर दहशतवादी हल्ला झाला. या सर्व घटना नैसर्गिक आणि मानवनिर्मित आपत्तींच्या आहेत. भारतात नैसर्गिक आणि मानवनिर्मित आपत्तीचे प्रमाण ५८.६ टक्के आहे. भूकंपाच्या आपत्तीखाली ४० लाख हेक्टर जमीन (जमिनीच्या १२ टक्के) येते, तसेच महापूर आणि जमिनीची धूप, माती वाहून जाणे, चक्री वादळे आणि त्सुनामी यांमुळे मोठे नुकसान होते. ६८ टक्के मशागतीयोग्य जमिनीपैकी बराचसा भाग दुष्काळी आणि पर्वतमय प्रदेशाखाली येतो. वाढती लोकसंख्या, शहरीकरण, औद्योगिकीकरण, पर्यावरणातील बदल, पिकाऊ जमिनीचे बांधकामपट्ट्यात रूपांतर इत्यादींमुळे आपल्यापुढे मानवनिर्मित आणि नैसर्गिक आपत्तींची अनेक आव्हाने निर्माण होण्याची शक्यता आहे.

**आपत्ती : व्याख्या, संकल्पना आणि अर्थ**

**आपत्तीची व्याख्या :**

वेबस्टर डिक्शनरीनुसार – "आपत्ती म्हणजे सर्वनाश करणारी भयंकर स्थिती होय."

ऑक्सफर्ड डिक्शनरीनुसार – "आपत्ती म्हणजे अचानक ओढवलेले मोठे दुर्दैवी संकट होय."

जागतिक आरोग्य संघटनेनुसार – "आपत्ती म्हणजे पृथ्वीवर प्रचंड हानिकारक घटना घडतात; त्यांमध्ये वित्तहानी, जीवितहानी व संपदाहानी यासारखे अनर्थ घडतात. अशा घटना म्हणजे आपत्ती होय."

**आपत्ती संकल्पना :**

आपत्ती संकल्पना व्यापक स्वरूपाची आहे. नैसर्गिक रीत्या पर्यावरणात आकस्मिक झालेल्या विनाशकारी बदलाशी तिचा संबंध जोडला जातो. तसेच आपत्ती नैसर्गिक आणि मानवनिर्मित घटना-घडामोडीशी संबंधित आहे. आपत्ती वैश्विक संकल्पना आहे. निसर्ग आणि मानवी कृतीचा आपत्तीशी संबंध येत असल्याने आपत्ती संकल्पना निश्चित स्पष्ट करता येत नाही. कारण संकटाचे स्वरूप कोणत्याही प्रकारचे असू शकते.

**आपत्तीचा अर्थ :**

आपत्तीला Disaster असे म्हटले जाते. Disaster हा फ्रेंच शब्द आहे. Dis + aster या दोन शब्दांपासून तो तयार झाला आहे. यामध्ये Dis म्हणजे bad (वाईट) आणि aster चा अर्थ (तारा) असा आहे. 'वाईट तारा' यामधून अशुभ किंवा संकट असा अर्थ सूचित होतो.

**आपत्तीचे वर्गीकरण :**

भारताची भौगोलिक रचना पाहता– सभोवतालचा समुद्रकिनारा, हिमालयाच्या पर्वतरांगा, डोंगराळ, आणि वालुकामय प्रदेश यांचा विचार करता– भारतापुढे नैसर्गिक आपत्ती हे मोठे आव्हान आहे. आपत्तीचे प्रमुख्याने नैसर्गिक आणि मानवनिर्मित आपत्ती असे वर्गीकरण केले जाते.

**१. नैसर्गिक आपत्ती –**

१) महापूर, २) दुष्काळ, ३) चक्री वादळ, ४) त्सुनामी.

**२. वातावरणाशी निगडित आपत्ती –**

१) उष्ण आणि थंड हवामान, २) ग्लोबल वॉर्मिंग, ३) समुद्राची पातळी उंचावणे, ४) ओझोन वायूचे प्रमाण कमी होणे.

**३. पर्वतमय प्रदेशातील आपत्ती –**

१) भूस्खलन, भूस्तररचना सरकणे, दरडी कोसळणे, २) बर्फ कोसळणे, ३) हिमवादळे.

**४. भौगोलिक आपत्ती –**

१) भूकंप, २) चक्री वादळे.

**५. मानवनिर्मित आपत्ती –**

१) जातीय आणि धार्मिक दंगली, २) नैतिक संघर्ष, ३) निर्वासित, ४) युद्ध, ५) दहशतवाद.

**आपत्तीचे इतर प्रकार –**

१) साथीचे रोग,
२) औद्योगिक धोके,
३) आग,
४) धोरण आपत्ती,
५) महामार्गावरील, रेल्वे, हवाई, सागरी वाहतूक आपत्ती,
६) यात्रा आणि सार्वजनिक उत्सव आपत्ती,
७) अन्नातील विषबाधा आपत्ती,
८) तांत्रिक आपत्ती,
९) आर्थिक व्यवस्थापन घोटाळे आपत्ती,
१०) धरण फुटणे,
११) रासायनिक अपघात, जैविक आणि किरणोत्सारी इत्यादींमुळे आपत्ती येऊ शकते.

**आपत्ती व्यवस्थापन –**

नैसर्गिक तसेच मानवनिर्मित आपत्तीमध्ये आपद्ग्रस्त लोकांना तातडीची मदत, अर्थसाहाय्य, पुनर्वसन आणि पुनर्निर्माणकार्याद्वारे मदत करणे म्हणजे आपत्ती व्यवस्थापन होय. आपत्ती व्यवस्थापनामध्ये नियोजन, संघटन, मनुष्यबळ, निर्देशन, सहकार्य-समन्वय, आर्थिक तरतूद, वेळेचे नियोजन, जोखीम कामगिरी, व्यूहरचना, संदेशवहन, माहिती. व्यवस्थापन इत्यादी घटकांचा समावेश होतो. आपत्ती व्यवस्थापनामध्ये – अ) आपत्तिपूर्व टप्पा, ब) आपत्कालीन टप्पा क) आपत्तीनंतरचा टप्पा अशा तीन टप्प्यांमध्ये कार्य केले जाते. ते पुढीलप्रमाणे–




आकृती क्र. १ आपत्ती व्यवस्थापन चक्र

(नॅशनल डिझास्टर मॅनेजमेंट इन इंडिया, एन. सी. डी. एम. दिल्ली.)

आपत्ती व्यवस्थापनामध्ये आपत्तीचे स्वरूप आणि परिणाम, आपत्तीचे ज्ञान, माहिती, आपत्तीची कारणे, आपत्तीची प्रक्रिया आपद्‌ग्रस्त प्रदेशातील वास्तव परिस्थिती, संरक्षणात्मक उपाययोजनांची अंमलबजावणी, उपाय आणि पर्यायी योजनांची निवड करण्यावर अधिक भर दिला जातो. पुढील आकृतिबंधातून आपत्ती व्यवस्थापनाची कार्यपद्धती स्पष्ट होते.

**व्यवस्थापनाची कार्ये** | **आपत्ती व्यवस्थापनातील कार्याचा भाग**

नियोजन
संघटन
सेवक वर्ग
मार्गदर्शन
समन्वय
माहिती देणे
अंदाजपत्रक
संसूचन
नेतृत्व
नियंत्रण
संशोधन
देखरेख




आपत्ती तीव्रता तपासणे
सुटका
प्रतिसाद
पुनर्वसन
पुनर्बांधणी
पुनःप्राप्ती
मूल्यमापन
साधनसामग्री गोळा करणे आणि वितरण
प्रतिबंधक उपाययोजना

आकृती क्र.२

**भारतातील आपत्ती व्यवस्थापन, प्रशासकीय संघटना:**

कोणत्याही खाते किंवा विभागामध्ये संघटनेच्या रचनेचे एक तत्त्व आहे. त्यामध्ये आज्ञाकक्ष, विशेषीकरण, पदसोपान, नियंत्रणकक्ष, अधिकार आणि जबाबदारी, एकात्मीकरण, कार्यांचे केंद्रीकरण व विकेंद्रीकरण, आणि सत्ताप्रदान व सुसूत्रीकरण या घटकांचा समावेश होऊन प्रशासकीय संघटना निर्माण होते. भारतात केंद्रसरकारच्या पातळीवर आपत्ती व्यवस्थापनाची प्रशासकीय रचना आपत्ती व्यवस्थापन कायदा अधिनियम २००५ नुसार केली आहे. ती पुढीलप्रमाणे–




राष्ट्रीय आपत्ती व्यवस्थापन केंद्रीय कार्यकारिणीचे अध्यक्ष पंतप्रधान असतात. त्यांच्या मदतीसाठी उपाध्यक्ष आणि पाच सदस्यांचा समावेश असतो.

अनुक्रमणिका

**राज्यस्तरावरील प्रशासकीय आपत्ती व्यवस्थापन संरचना (राज्यशासन)**




राज्य आपत्ती व्यवस्थापन कार्यकारिणीमध्ये मुख्यमंत्री अध्यक्ष असतात. तसेच उपमुख्यमंत्री, संयोजक मदत आणि पुनर्वसन मंत्री आणि इतर सदस्यांची निवड मुख्यमंत्र्यांकडून केली जाते.

**जिल्हास्तरीय आपत्ती व्यवस्थापन प्रशासकीय संरचना**






जिल्हा आपत्ती व्यवस्थापन प्रशासकीय यंत्रणेमार्फत पुढील कामे केली जातात.

१. जिल्हा पातळीवर आपत्ती व्यवस्थापन करण्यासाठी सुसूत्रता आणणे.

२. आपत्ती व्यवस्थापनाची योजना तयार करून तिची अंमलबजावणी करणे.

३. राष्ट्रीय आपत्ती व्यवस्थापन कार्यकारिणी (NDMA) National Disaster Management Authority आणि राज्य आपत्ती व्यवस्थापन कार्यकारिणी (SBA) State Authority Disaster Management यांच्या मार्गदर्शक तत्त्वांनुसार जिल्हा आपत्ती व्यवस्थापन अधिकारी कार्य करेल.

४. आपत्तिप्रवण विभाग ओळखून जिल्हा आपत्ती व्यवस्थापनाकडून योजना तयार करणे.

५. आपत्तिप्रतिबंधक उपायांसाठी नेतृत्व आणि मार्गदर्शन करणे.

६. कोणत्याही प्रकारची आपत्ती आल्यास तीव्रता कमी करणे.

७. जिल्हा प्रशासनातील महसूल, पोलिस, अग्निशमन दल, आरोग्य, रेल्वे वाहतूक, राज्यपरिवहन मंडळ, राज्यविद्युत मंडळ, सार्वजनिक बांधकाम विभाग, पाटबंधारे विभाग, भारत दूरसंचार निगम, जिल्हा माहिती कार्यालय, शाळा, महाविद्यालय, विद्यापीठ स्तरावरील राष्ट्रीय सेवा योजना, राष्ट्रीय छात्र सैनिक, स्वयंसेवी संघटना, मंडळे यांचेही सहकार्य घेऊन आपत्ती व्यवस्थापनामध्ये राष्ट्रीय कार्य आणि कर्तव्ये म्हणून सर्वांना आवाहन केले जाते.

**महापूर आपत्ती व्यवस्थापन :**

महापूर ही अनर्थकारी आपत्ती आहे. जास्त पावसामुळे नद्यांचे पाणी दोन्ही काठांपासून आजूबाजूच्या क्षेत्रात पसरते, तेव्हा त्यास महापूर म्हणतात. समुद्राच्या पाण्याच्या पातळीत वाढ होऊन काही वेळा किनारी प्रदेशात समुद्राच्या पाण्यामुळे महापूर निर्माण होतात. त्सुनामीसारख्या प्रलयकारी लाटा किनारी भूप्रदेशात महापुरासारखी स्थिती निर्माण करतात.

**महापुराची कारणे :** (Causes of Floods)

महापुराची कारणे नैसर्गिक त्याचप्रमाणे मानवनिर्मित आहेत. त्यामध्ये प्रामुख्याने –

**१. नद्यांची उगमक्षेत्रे व जलसंग्रहक क्षेत्रे** (Catchment Areas) – अशा ठिकाणी मुसळधार पाऊस, ढगफुटी किंवा बर्फ वितळल्यामुळे पाण्याच्या पातळीत वाढ होऊन भारतात महापूर येतात. गंगा, यमुना, ब्रह्मपुत्रा या नद्यांना मोसमी पावसाच्या काळात आणि उन्हाळ्यात उगम-क्षेत्रातील बर्फ वितळल्यामुळे महापूर येतात.

**२. भूकंप** – काही वेळा, समुद्रकिनारी प्रदेशात भूकंपामुळे निर्माण होणाऱ्या लाटांमुळे पूरस्थिती निर्माण होते.

**३. धरण फुटणे** – अनेक वेळा नद्यांवरील धरणे, बंधारे फुटल्यामुळे पूरस्थिती निर्माण होते. १९६१ मध्ये पानशेत धरण फुटल्यामुळे पुणे येथे महापूर आला होता.

**४. उथळ पात्र** – नद्यांच्या पात्रात गाळाचे संचयन होऊन नदीचे पात्र उथळ होऊन महापुराची परिस्थिती निर्माण होते.

**५. मुसळधार पाऊस** – चक्री वादळ आणि मुसळधार वृष्टीमुळे पाण्याचे प्रमाण वाढून महापुराची आपत्ती निर्माण होते.

**६. सांडपाण्याचा योग्य निचरा न होणे** – मान्सूनच्या काळात मोठ्या शहरांत सांडपाणी-नाले यांचा निचरा नद्या अथवा समुद्रात होतो. परंतु प्लास्टिक कचरा, नद्यांची रुंदी कमी करणे, बांधकामे इत्यादींमुळे पाणी-निचरा करणारी व्यवस्था अपुरी पडते. गटारे तुंबतात आणि पाणी रस्त्यांवर, झोपड्या आणि बिल्डींगमध्ये पसरते. त्यामुळे महापुराची परिस्थिती निर्माण होते. २६ जुलै २००५ रोजी मुंबईत एकाच दिवशी ९४४ मि मि. इतका विक्रमी पाऊस पडला, हवामानातील बदलांमुळे समुद्राला भरती आली. अधिक प्रमाणात आलेल्या पाण्याचा निचरा न झाल्याने मुंबईत महाजलप्रलय झाला. मिठी नदीचे पात्र अरुंद झाल्यामुळे पाणी शहरात पसरले.

**महापुराचे पर्यावरणावरील परिणाम :**

महापुराचा पर्यावरणावर घातक परिणाम होतो. महापुराच्या परिसरातील जुन्या किंवा कमकुवत इमारती ढासळतात. महापुरामुळे जीवित व वित्तहानी होते. पिके व वनस्पतींचे नुकसान होते. दरडी कोसळतात. नदीकाठा-






वरील वसाहती पाण्याखाली बुडतात. त्याचप्रमाणे वस्तू, पदार्थ, अन्नपदार्थ प्रदूषित होतात. रेल्वे व रस्ते यांची हानी होते. २६ जुलै २००५ च्या महापुरामुळे मुंबई, ठाणे, रायगड या जिल्ह्यांतील रेल्वे, रस्तेवाहतूक पूर्णपणे विस्कळीत झाली होती.

**महापूर आपत्ती व्यवस्थापन :**

महापुराचे पाणी इतरत्र पसरू नये म्हणून जे उपाय केले जातात, त्यास महापुराचे किंवा पूरनियंत्रण व्यवस्थापन असे म्हणतात.

**आपत्ती व्यवस्थापनाद्वारे महापुराचे नियंत्रण :**

महापुरावर पुढील प्रकारच्या उपाययोजनांद्वारे नियंत्रण ठेवता येते. त्यामध्ये प्रामुख्याने –

१. नदीकाठी वृक्षांची लागवड केल्यास पुराचा वेग मंदावतो. महापुरात नदीतील पाणी विस्तारते, त्यास रोखता येते. पाणी जमिनीत मुरण्यास मदत होते. म्हणून वृक्षतोड रोखण्यात यावी.

२. नदीकाठावर बांध किंवा संरक्षक भिंती बांधाव्यात.

३. महापूर रोखण्यासाठी नदीचे पात्र उथळ असेल, तर खोल व रुंद करावे. गाळ साचणार नाही याची दक्षता घ्यावी.

४. नदीचे पात्र नागमोडी असेल तर महापुरामुळे प्रदेश जलमय होतो, म्हणून पूर येणाऱ्या नदीचे प्रवाह मान्सूनपूर्वी सरळ करावेत.

५. नद्यांवर मोठी धरणे, बंधारे बांधून पाणी अडवून ठेवावे. त्यामुळे महापुरावर नियंत्रण ठेवता येते.

६. गावतळी दुरुस्त करावी. शेततळी, पाझर तलाव बांधून 'पाणी अडवा पाणी जिरवा' मोहीम मोठ्या प्रमाणात राबवावी.

७. नदीजोड प्रकल्पाद्वारे महापुरावर नियंत्रण ठेवता येते. अशा प्रकारे उपाययोजना केल्यास महापुरावर नियंत्रण ठेवणे शक्य होते.

महापुराच्या आपत्ती व्यवस्थापनात निराधार लोक, वृद्ध, स्त्रिया, लहान मुले, गुरे, जनावरे यांच्याकडे विशेष लक्ष द्यावे लागते.

**आपत्ती व्यवस्थापन व राष्ट्रीय कर्तव्याचा संबंध :**

१९७६ च्या ४२ व्या संविधान दुरुस्तीने भारतीय संविधानात दहा मूलभूत कर्तव्यांचा समावेश केला आहे.. भारतीय संविधानाच्या प्रकरण चारमधील राज्याच्या मार्गदर्शक तत्त्वांमध्ये कलम ५१ क मध्ये तरतूद करण्यात आली असून सार्वजनिक संपत्तीचे रक्षण करणे, हिंसाचाराचा निग्रहपूर्वक त्याग करणे, आवाहन केले जाईल तेव्हा राष्ट्राचे संरक्षण करणे, आणि राष्ट्रीय सेवा बजाविणे इत्यादी महत्त्वाची कर्तव्ये आहेत. नैसर्गिक किंवा मानवनिर्मित आपत्तीला सामोरे जाण्यासाठी आपण सर्व भारतीयांनी सहभागी होऊन देश माझ्यासाठी काय करतो, यापेक्षा मी देशासाठी काय करतो, ही भावना मनात सतत तेवत ठेवल्यास आपण कोणत्याही आपत्तींशी सामना करू शकतो, हे अनेक आपत्तींवेळी आपण सिद्ध केले आहे, आणि यापुढेही आपत्ती व्यवस्थापनाद्वारे आपण कोणतेही आव्हान पेलण्याचे सामर्थ्य निर्माण करू या.

**संदर्भसूची –**

1. Ray P. K.,Disaster preparedness Against Accidents or, Terrorist Attack, Chemical Biolgocial / Radiological; New Age International (P) Limited, Publishers - (Edited) 2006

2. Yadav R. J., Disaster Management in India Acts : Policies : Guidelines Vol.-I, Paradise Publishers, Jaipur (India) 2011

3. Yadav R. J., Disaster Management in India Acts : Policies : Guidelines Vol.-II, Paradise Publishers, Jaipur (India), 2011

४. मराठे, प्र. प्र., गोडबोले व्ही. जे., आपत्ती व्यवस्थापन : संकल्पना आणि कृती, डायमंड पब्लिकेशन, पुणे, २००६.

५. देशमुख एल. जी., वैज्ञानिक पद्धती, निराली प्रकाशन, पुणे, आवृत्ती २०००.

६. इनामदार ना. र. ; लोकप्रशासन, महाराष्ट्र विद्यापीठ ग्रंथनिर्मिती मंडळ, साधना प्रकाशन, पुणे, १९७५.










# भारतीय आदिवासींची चरित्रे : एक विवेचन

प्रा. डॉ. अनंता सूर

मराठी साहित्यामध्ये दलित साहित्याचा एक उपविभाग म्हणून आदिवासी साहित्याकडे पाहावे लागते. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या वैचारिक, सामाजिक, परिवर्तनवादी पार्श्वभूमीतून जे साहित्य आकाराला आले, ते म्हणजेच दलित साहित्य. आदिवासी साहित्याची प्रेरणा-सूत्रे काही प्रमाणात बाबासाहेबांच्या भूमिकेतून शोधणे गरजेचे आहे. माणूस संघर्षशील, जागृत होऊन समाजाचा विकास व्हावा, असे बाबासाहेबांना वाटे. जो समाज दारिद्र्याच्या अंधारात कित्येक पिढ्यांपासून जगत आहे, त्याचे जगणे 'माणूस'मय व्हावे ही बाबासाहेबांची आंतरिक इच्छा होती. म्हणूनच आदिवासी जमातीचा अभ्यास करताना कोणकोणत्या साहित्यकृतींतून हा आदिवासी बांधव आपले संघर्षमय जगणे घेऊन उभा राहिला, याचा शोध घेण्याची गरज आहे.

आजच्या स्थितीत महाराष्ट्रात आदिवासींच्या एकूण ४७ प्रमुख जमाती अस्तित्वात आहेत. शिवाय या आदिवासी जमातींच्या उपजमातीही विखुरलेल्या दिसतात. विशेषतः महाराष्ट्रात सह्याद्रीच्या पूर्व-पश्चिम उतारापासून ते सलग सातपुड्याच्या रांगांतून आग्नेयेस महादेव डोंगराच्या रांगांपर्यंत आदिवासींचे वास्तव आहे. शहरी किंवा ग्रामीण भागापासून दूर डोंगरदऱ्यांमध्ये वृक्षवेलींच्या सान्निध्यात राहणाऱ्या या आदिवासींचे जगणे पूर्णतः निसर्गावरच अवलंबून आहे. स्वातंत्र्याच्या पासष्ट वर्षांनंतरही मानवी स्वातंत्र्याचा खरा प्रकाश अद्यापही आदिवासी समाजापर्यंत पोचला नाही, ही खरेतर या देशाने त्यांच्या वाट्याला घातलेली सांस्कृतिक खंत म्हणता येईल.

आदिवासी शब्द उच्चारताच आदि + निवासी अर्थात मूळ राहणारा तो आदिवासी, हे शाब्दिक दृष्ट्या खरे असले, तरी त्याचे जगणे कसे परिवर्तनशील, गतिमान करता येईल, याकडे सामूहिक रीत्या लक्ष देण्याची गरज आहे. आजही आदिवासी समाजामध्ये 'बामणाच्या जन्माला जाशील तर लिखू लिखू मरशील, वारल्याच्या जन्माला जाशील तर जंगलचा राजा होशील', ही म्हण सर्वश्रुत आहे. हा आदिवासी खऱ्या अर्थाने आज जंगलाचा राजा राहिला काय? वनकायद्याने त्यांच्या नैसर्गिक जगण्यावर अंगोपांगी आघात केल्यामुळे तो आपल्याच मूळ संस्कृतीपासून पारखा होत जाण्याचीही भीती निर्माण होऊ लागली आहे.

आदिवासी समाजातील काही तरुण आज सुशिक्षित झाला असला, तरी बहुतांशी समाज मात्र जंगलाच्या दैनंदिन कोषागारातून बाहेर पडलेला नाही. त्यांची लोकगीते, संगीत, नृत्यकला, सण, उत्सव, सामाजिक प्रथा, पंचायत, देवपूजा, श्रद्धास्थान, मृताच्या उत्तरक्रियेच्या वेळी म्हटली जाणारी गीते, उखाणे, म्हणी, वाक्प्रचार, कलाकुसर, वाद्ये, मनोरंजनाची साधने, भगताचे महत्त्व, गोटूल, आदिवासी समाजसुधारकांचे कार्य, आदिवासी बांधवांचे साहित्यातील योगदान, आदिवासींची लोकगीते, गौराईची गीते, दिवाळीची गीते, लग्नाची गाणी, कामडी नाचाची गाणी, आदिवासी समाजाचा वाघदेव, पांढरदेव, हिवऱ्या देव, नारायण देव तसेच भिल्ल, महादेव कोळी, कातकरी, ठाकर, वारली, कोकणा, पावरा, मावची, माडीया, परधान, गोंड या आदिवासी समाजाच्या सर्वांगीण अभ्यासाची गरज आहे.

आदिवासी समाजातील बांधवांनी ज्या महान व्यक्तींची चरित्रे साहित्यातून मांडली, ते त्यांचे कर्तृत्व वाचकांसमोर यावे या हेतूने मी या ठिकाणी 'भारतीय आदिवासींची चरित्रे' हा विषय निवडला. आदिवासी क्रांतिकारकांचे चरित्र पुढे यावे, हा यामागील प्रामाणिक हेतू आहे.

दलित साहित्याच्या मानाने आदिवासी साहित्यामध्ये मोठ्या प्रमाणात लेखन झाले नसले, तरी आदिवासी बांधवांनी वाङ्मयीन लेखनासाठी काव्य, कादंबरी, कथा, चरित्रे-आत्मचरित्रांच्या रूपाने जे योगदान दिले, ते अतिशय मौलिक आहे. त्यांनी भोगलेल्या वेदना साहित्यातून ज्या आत्मीयतेने प्रखर रीत्या मांडल्या, त्यामुळे खऱ्या अर्थाने आदिवासी समाजाचा खरा इतिहास समजण्यास मोठ्या

प्रमाणात मदत झाली. अन्यथा दऱ्याखोऱ्यांत, रानावनांत जगणाऱ्या आदिवासी नायकाचे चरित्र साहित्यात कुणी अधोरेखित केले असते? त्यांच्या जैविक वेदनेला कुणी आपल्यासमोर उभे केले असते? हे समजण्यासाठी भारतीय आदिवासींची चरित्रे त्यांच्या संघर्षासह वाचकांसमोर येण्याची खऱ्या अर्थाने गरज आहे.

१९६८ मध्ये व्यंकटेश आत्राम यांनी 'दोन क्रांतिवीर' हे चरित्रात्मक पुस्तक रघुनाथ शहा आणि शंकर शहा या आदिवासी क्रांतिकारक वीरांच्या जीवनसंघर्षाला उभे करण्यासाठी लिहिले आहे. आत्रामांचे हे केवळ ७७ पृष्ठांचे पुस्तक अमरावतीच्या सेवा प्रकाशनाने १८ सप्टेंबर १९६८ रोजी प्रसिद्ध केले. प्राचार्य भाऊ भालेराव यांची या चरित्रग्रंथाला प्रस्तावना लाभलेली आहे. शंकर शहा आणि रघुनाथ शहा या आदिवासी क्रांतिवीरांनी केलेला उठाव यात मांडला आहे. ज्या आदिवासींना आपल्या समाजातील वीरपुरुषांची जाण नाही, त्यांनी हे चरित्र वाचल्यास आपला इतिहास किती उज्ज्वल होता याची जाणीव झाल्याशिवाय राहत नाही. १८५७ च्या स्वातंत्र्यसमराच्या पार्श्वभूमीवर शंकर शहा आणि रघुनाथ शहा या पितापुत्रांनी इंग्रजांविरुद्ध मायभूमीसाठी जो लढा दिला, त्याचे वास्तवदर्शी चित्रण या चरित्रात वाचायला मिळते. याच स्वातंत्र्यलढ्यात सहभागी झालेल्या भिल्ल वीर पंड्या, बंदी, सुखा, हरिया, चौऱ्यागडचा गौंड राजा चैनशहा, सातपुड्यातील महान लढवय्या गोंड नायक सीताराम शहा, अहेरी गोंड संस्थानातील वीरनेता मोलमपल्लीचा बापूराव व त्याचा सहकारी, आलापल्ली येथील व्यंकटराव ह्या शूर वीरांच्या कार्याचा सखोल परिचयसुद्धा आत्रामांनी करून दिला आहे.

शंकर शहा गढामंडल्याचा शेवटचा नरेश असूनही त्याचे संपूर्ण जीवन रानावनाच्या सानिध्यात गेले. राजाचे ऐश्वर्यसंपन्न जीवन वाट्याला न येता जीवनाची शोकांतिका झाली. हेच दिवस पुढे रघुनाथ शहाच्याही वाट्याला आले. मात्र 'इंग्रजांची सावली पडणे म्हणजे नरकात जाणे' ही वृत्ती मनी बाळगून शंकर शहा जगला. इंग्रजांचे वर्चस्व झुगारून देण्यासाठी त्याने स्वत:ची सेना सज्ज करीत आपण स्वतंत्र राजे असल्याचा निर्भयपणा सिद्ध केला. इंग्रजी राजसत्तेला उघडपणे शह देणाऱ्या शंकर शहाची तुलना आत्रामांनी 'एक महातेजस्वी पुरुष' अशा शब्दांत व्यक्त केल्याचे दिसते. शंकर शहाचे राजघराणे तपशिलांसह नोंदविलेले दिसते. नर्मदेच्या जंगलातील गोंड, कोरकू आणि भिल्लांना शंकर शहांनी आपले सहकारी बनविले. तो कविहृदयी आणि सद्भावनेचा पुतळा असल्यामुळे आदिवासी टोळ्यांमध्ये अधिक लोकप्रिय झाला होता.

शेवटी ह्या आदिवासी क्रांतिकारकांशी इंग्रज किती निष्ठूरपणे वागले, याचेही हृदयस्पर्शी चित्रण आत्रामांनी केले आहे. तोफेच्या तोंडी बांधून १८ सप्टेंबर १८५७ रोजी या पितापुत्रांना मृत्युदंडाची कठोर शिक्षा देण्यात यावी, असा आदेश काढण्यात आला. या प्रकरणाला 'मृत्यूचे सहर्ष स्वागत' असे आत्रामांनी नाव दिले. या पितापुत्रांच्या मरणापूर्वीच्या स्थितीचे चित्रण मांडताना ते म्हणतात, 'शंकर शहाचे पांढरे केस, ती त्याची वृद्धावस्था आणि पुढे तोफेच्या रूपाने मृत्यू उभा असताना चेहऱ्यावर विलसणारी अत्यंत निर्भयता आणि त्याचा स्वाभिमान इत्यादी स्थिती पाहून आमची मने द्रवल्यावाचून राहिली नाहीत... शंकर शहाच्या इंग्रजांविरुद्ध कारस्थानाचे स्मरण बाळगून, हा चित्तविकार आवरणे, इंग्रज राज्यकर्त्यांना अत्यंत आवश्यक होते. तरी पण इंग्रजांनी आपला दिलदारपणा दाखविण्यासाठी शंकर शहाला शरण येण्यास सांगितले आणि त्यांच्या प्राणांची सुटका करून घेण्यास त्या दोघांना संधी दिली.' हे आत्रामांचे चरित्रमय पुस्तक आदिवासी साहित्याला नवी दिशा देणारे ठरते, यात शंका नाही

'आदिवासी वीर पुरुष' या चरित्रमय पुस्तकात डॉ. गोविंद गारेंनी आदिवासी समाजातील वीर आणि क्रांतिकारकांच्या ऐतिहासिक–राजकीय कर्तृत्वाचे दर्शन विस्तृतपणे घडविल्याचे दिसते. भारतीय इतिहासामध्ये आदिवासी उपेक्षित राहिलेला असला, तरी महादेव कोळी, भिल्ल, गोंड अशा आदिवासी जमातींतून जे क्रांतिकारक जन्माला आले, त्यांचे ८५ पृष्ठांमध्ये वर्णन आलेले आहे. भिल्लांचा पहिला ऐतिहासिक उल्लेख इ. स. ६०० मध्ये मिळतो. इ. स. १७८० ते १८०० च्या कालखंडात भिल्लांनी ज्या बंडाळ्या केल्या, त्यामध्ये उमेड वसावा, काजीसिंग, भीमा नाईक व मावश्या

नाईकाचे बंडही महत्त्वाचे ठरते. सावकारांच्या अत्याचारी आणि अन्यायग्रस्त विळख्यातून आदिवासी समाजाला मुक्त करण्यासाठी 'गरिबांचा रॉबिनहूड' म्हणून ओळखल्या जाणाऱ्या तंट्या भिल्लाचा लढा मोलाचा आहे. तसेच शिवरायांच्या काळात जुन्नर प्रांतातील डोंगरी किल्ल्यांचे आधिपत्य महादेव कोळी या आदिवासी जमातीच्या नायकाकडे असल्याचे पुरावे मिळतात. इ. स. १६५७ मध्ये शिवरायांच्या स्फूर्तीने महादेव कोळी जमातीने मोगलांविरुद्ध हालचाली सुरू केल्या. ही बाब बादशहाला कळताच त्याने हजारो महादेव कोळी लोकांची मुंडकी उडवली. हा चबुतरा, चौथरा जुन्नरला आजही आहे. त्यालाच काळा चौथरा म्हणून ओळखले जाते. हा प्रसंग जालियनवाला बागेतील कत्तलीपेक्षाही भयावह असल्याची नोंद डॉ. गारेंनी केली आहे.

याशिवाय इ. स. १७६० ते १७९९ या काळात पेशव्यांविरुद्ध उठाव करणारे राघोजी भांगरे, होन्या केंगले, चंद्रपूरचे गोंडराजे, देवगडचे गोंडराजे, कुँवरसिंग वसावा, खाज्या नाईक, शहीद बापूराव शेडमाके, वीरांगना महाराणी दुर्गावती यांच्या मौलिक कार्याचाही उल्लेख आला आहे.

'ठक्करबाप्पा' या चरित्रात्मक छोटेखानी पुस्तकात डॉ. गोविंद गारेंनी आदिवासी बांधवांसाठी, हरिजनांसाठी ठक्करबाप्पांनी आयुष्यभर कोणते कार्य केले, यावर प्रकाश टाकला आहे. नामदार गोखल्यांनी स्थापन केलेल्या भारत सेवक समाजाचे सभासदत्व स्वीकारून त्यांनी समाजसेवेचा आदर्श स्वीकारला. बालपणापासून गरीब व दुःखी लोकांचे जीवन जवळून बघण्यास मिळालेल्या ठक्करबाप्पांचा जन्म २९ नोव्हेंबर १८६९ रोजी सौराष्ट्रातील भावनगरमध्ये झाला. त्यांचे मूळ नाव अमृतलाल विठ्ठलदास ठक्कर असून त्यांचे पूर्वज पंजाबमधून आलेले होते. आई-वडिलांकडून त्यांना दीनदुबळ्यांविषयी जिव्हाळा आणि कळवळा बाळगण्याचे संस्कार मिळाले. इ. स. १९१८-१९ मध्ये गुजरातमधील पंचमहाल जिल्ह्यात पडलेल्या भयंकर दुष्काळात आदिवासी भिल्लांना मदत करण्यासाठी त्यांना पाठविण्यात आले. त्या वेळी भिल्लांचा भोळाभाबडा स्वभाव, दारिद्र्य, व्यसनाधीनता आणि अज्ञानामुळे ते कशा प्रकारे गुलामीचे जिणे जगत आहेत, यांचा त्यांना प्रत्यय आला. यातूनच पुढे त्यांनी भिल्ल सेवा मंडळांची स्थापना केली. त्यांनी भिल्लांसाठी शाळा काढल्या. संथाल, नागा, खासी, मुंडा इत्यादी आदिवासी जमातींच्या संबंधाने लेखही लिहिले. शिवाय मूळ संस्कृत रामायणाचे भिलोरी भाषेत 'संक्षिप्त रामायण'ही त्यांनी सहकाऱ्यांकडून करवून घेतले. महाराष्ट्रात ठाणे, धुळे आणि नाशिक या तीन जिल्ह्यांत भिल्लांच्या उद्धारासाठी ठक्करबाप्पांनी सेवाभावी संस्था सुरू केली. दरवर्षी ५०० बालकांना शिक्षण देण्याचे काम त्यांनी उभारलेल्या आश्रमशाळांतून केले जाते. 'अखिल भारतीय आदिम जाती सेवक संघ' नावाची संघटना उभारून आपले सर्व जीवन समाजसेवेसाठी वेचणारे ठक्करबाप्पा १२ जानेवारी १९५१ला काळाआड गेले.

'गोंडवानातील क्रांतिवीर नारायणसिंह उईके' हे डॉ. विनायक तुमरामांनी लिहिलेले चरित्रपर पुस्तक क्रांतिवीर नारायणसिंह उईकेंच्या सामाजिक कार्यावर प्रकाश टाकणारे आहे. त्यांचा जन्म ११ जुलै १९१७ रोजी गोंदियाला झाला. वडील पेशाने शिक्षक असल्यामुळे बालपणापासून त्यांच्यावर समाजसेवेचे संस्कार झाले. शालेय जीवनात खो-खो, कब्बडी आणि फुटबॉलचे 'बेस्ट प्लेअर' म्हणूनही प्रसिद्धी मिळविली. शिक्षकाची नोकरी धिक्कारून काही काळ धानोरा गोंडपिपरी येथे त्यांनी रेव्हेन्यू इन्स्पेक्टर म्हणून काम केले. या काळात रात्री आदिवासींच्या गावात मुक्काम करण्याचे प्रसंग येऊ लागल्यामुळे आदिवासींच्या समस्यांचे खऱ्या अर्थाने त्यांना आकलन झाले. त्या समस्या सोडविण्यासाठी काय करता येईल, यावर त्यांनी आपले लक्ष केंद्रित केले. पुढे हीसुद्धा नोकरी सोडून चंद्रपूरच्या न्यू इंग्लिश हायस्कूलमध्ये शिक्षकाची नोकरी स्वीकारली. आपले कार्य केवळ सभा, संमेलने आणि भाषणापुरतेच मर्यादित न ठेवता आदिवासींच्या सामाजिक-शैक्षणिक विकासासाठी काही रचनात्मक कार्य कसे करता येईल, याचा ते विचार करू लागले. त्यासाठी त्यांनी 'चांदा जिल्हा काँग्रेस आदिवासी सेवा मंडळ' स्थापन केले. त्याचे अध्यक्ष म्हणून बहुमताने ते निवडून आले. या मंडळामार्फत गरीब व होतकरू आदिवासी विद्यार्थ्यांकरिता तालुका पातळीवर वसतिगृह चालविणे, अत्यंत मागासलेल्या

भागात शाळा काढणे, जिल्ह्यातील सुशिक्षित इसमांची नोंद ठेवणे, वाईट चालीरीती बंद करणे आणि सरकारच्या आदिवासी कल्याण योजनेला मदत करणे इत्यादी बाबींचा समावेश करण्यात आला. १९५२ सालच्या निवडणुकीत काँग्रेस पक्ष उमेदवाराच्या विरोधात ते प्रचंड बहुमताने निवडून आमदार झाले. परिणामी १९५० ते १९५५ या काळात ते विदर्भाच्या कानाकोपऱ्यांत व आदिवासींच्या घराघरांपर्यंत जाऊन पोचले. प्रत्येक कार्यकर्त्यांशी जवळीकता, संयमी आचरणामुळे आदिवासी समाज-बांधवांवर त्यांची वेगळी छाप पडली.

आदिवासी जोपर्यंत संघर्ष करून स्वतःच्या बळावर उभा होणार नाही, तोपर्यंत त्याचे दारिद्र्य, अज्ञान, वेठबिगारी संपणार नाही, याची त्यांना जाणीव होती. म्हणूनच विदर्भामध्ये आदिवासींचे समाजप्रबोधन आणि जनजागृती व्हावी, या दृष्टिकोनातून त्यांनी 'नागविदर्भ आदिवासी सेवा मंडळ' निर्माण केले. आदिवासींचे प्रश्न मांडण्यासाठी ६ डिसेंबर १९६० रोजी ६० हजार आदिवासींचा मोर्चा नागपूर येथे काढून महाराष्ट्र विधानसभेवर नेला. इथूनच खऱ्या अर्थाने आदिवासी माणूस जागा झाला, असे म्हणावयास मुळीच हरकत नाही. त्यांना आदिवासींचे कैवारी ठक्करबाप्पांविषयी नितान्त आदर होता. परंपरागत जीवन जगत असलेल्या गोंडी, कोलामी, माडीया, कोरकू आणि भिल्ली भाषा बोलणाऱ्या आदिवासी मुलांना शिक्षकांची भाषा समजणे कठीण असल्यामुळे पुस्तके त्यांच्याच बोलीभाषेत निर्माण केली जावी, असे त्यांनी शासनाला निवेदनही दिले. म्हणून 'नारायणसिंहजी उईकेचा क्रांतिप्रवास म्हणजे आदिवासींचे मुक्तिलढे निर्णयाप्रत पोचविण्यासाठी केलेल्या उठावणींचा चरित्रपट होय', असे विधान डॉ. तुमरामांनी आत्माविश्वासाने केल्याचे जाणवते. आदिवासींच्या जीवनाला सर्वांगीण प्रतिष्ठा मिळवून देण्यासाठी अहोरात्र झटणारे नारायणसिंहजी २६ जुलै १९७२ ला काळाआड गेले. परंतु त्यांचे कार्य मात्र आजही अजरामर आहे.

'धरतीआबा : जनचेतनेचे विद्रोही रूप' हे बिरसा मुंडाच्या क्रांतिकारी शौर्यावर प्रकाश टाकणारे चरित्रात्मक पुस्तक डॉ. विनायक तुमराम यांनी लिहिले. ब्रिटिशांच्या जुलमी सत्तेला पहिल्यांदा खऱ्या अर्थाने विरोध करणारे आदिवासीच होते. त्यांनीच ब्रिटिशांविरुद्ध लढे देऊन रानावनांत जीवन कंठणाऱ्या आदिवासी बांधवांचा आवाज खऱ्या अर्थाने बुलंद केला. याच देशातील शेठ, सावकार, जमीनदार, ठेकेदार, मालगुजार, सामंत, पुरोहित, आधिकारी यांच्यासोबत ब्रिटिश राजवटीशीही एकाच वेळी लढा देणारा क्रांतिकारक म्हणजे बिरसा मुंडा होय. त्याचा जन्म १५ नोव्हेंबर १८७५ रोजी उलीहातु नावाच्या खेड्यात झाला. त्याच्या वडलांचे नाव सुगना तर आईचे नाव करमीहातु असे होते. त्याला दोन भाऊ आणि दोन बहिणी होत्या. बालपणापासूनच तो शांत आणि गंभीर स्वभावाचा असला, तरी अन्यायाविरुद्ध त्याला चीड होती. घरातील दारिद्र्यामुळे तो इसाई बनला. त्याला बासरी वाजविण्याची आवड होती.

आदिवासींच्या अज्ञानाचा फायदा घेऊन मिशनरी, शेठ-सावकारांनी ज्या वेळी त्यांच्या हक्काच्या जमिनी बळकावल्या आणि जंगलातील त्यांचे जैविक अधिकार हिरावून घेतले, त्या वेळी मुंडा, संथाल, ओरॉव, खॉसी, हो, गारो, कोल्हाण, गोंड या आदिवासी जमातींनी त्यांच्याविरुद्ध आंदोलन छेडले. पुढे हेच आदिवासी मिशनऱ्यांविरुद्ध लढल्यामुळे बिरसाला आपले शिक्षण सोडावे लागले. त्यानंतर एका स्वप्नात त्याला आपण वगळता इतर कोणीही झाडावर चढू शकले नाही, असे दिसल्यामुळे त्याला प्रेरणा मिळाली. इथूनच आपल्या हातून निश्चितच वेगळे काहीतरी घडणार असल्याची जाणीव झाली. पुढे इ.स. १८९४ मध्ये छोटा नागपूर परिसरात मोठ्या प्रमाणावर जो दुष्काळ पडला, त्या वेळी बिरसाने आपल्या निष्ठावान साथीदारांना मदतीला घेऊन लोकांच्या घरी धान्य पुरविले. परिणामी आदिवासी लोक त्याला आपले कैवारी म्हणू लागले. त्यानंतर काही दिवसांनी 'वन शुल्क माफी'चा लढा उभारून त्याने आदिवासींना आपल्या अधिकाराची जाणीव करून दिली. त्यानंतर 'जंगलराज संस्थे'ची स्थापना करून आदिवासींचे संघटन अधिक मजबूत केले. ११ ऑगस्ट १८९७ला तीन हजार आदिवासी लोकांचा समूह घेऊन मागण्या मान्य करण्यासाठी खुंटी येथे पोचला असता इंग्रज अधिकाऱ्यांनी त्यांच्यावर बेछूट गोळीबार केला. त्यामध्ये अनेक आदिवासी शहीद झाले. १८९८ मध्ये तनगा

नदीच्या काठी इंग्रज आणि बिरसाचे सैनिक यांच्यात चकमक होऊन इंग्रजांचे सैन्य हरले. परिणामी त्यांनी लोकांची धरपकड सुरू केली. गया मुंडासारखा निष्ठावान व लढाऊ शिपाई बिरसाला लाभला. वाईट गोष्टी नाकारून चांगल्या गोष्टींचा स्वीकार करावा, असे साधेसोपे तत्त्वज्ञान त्याने साऱ्यांना पटवून सांगितले. वनस्पतींचा प्रभावीपणे वापर करून आजार व रोग दुरुस्त करण्याची कलाही त्याला अवगत होती. ९ जून १९०० या दिवशी त्याला रक्ताच्या उलट्या झाल्या आणि प्राण गेला. काहींनी बिरसा कॉलऱ्यामुळे मरण पावला, असे गणित मांडले. अवघ्या २५ वर्षांच्या आयुष्यात बिरसाने जे क्रांतिकार्य केले, ते ऐतिहासिक आहे. म्हणूनच बिरसाच्या या चरित्राविषयी आपले निवेदन मांडताना, 'बिरसा मुंडा हे भारतीय स्वातंत्र्यलढ्यातील एका समर्पित क्रांतिकारक आदिवासी तरुणाचे नाव आहे. भारतीय स्वातंत्र्याच्या क्षितिजावर तो एक शौर्यतारा होता. पारतंत्र्य हे शाप मानणारा, तो एक स्वातंत्र्यप्रिय रणझुंजार होता. जनसामान्यांचे जन्मसिद्ध अधिकार हिरावणाऱ्या धुंद पाशवी प्रवृत्तीला व निर्मम दडपशाहीला वठणीवर आणण्यास प्रतिज्ञाबद्ध झालेले धाडस म्हणजे बिरसा!' हे गौरवोद्‌गार डॉ. विनायक तुमरामांनी संवेदनशील भावनेने काढल्याचे जाणवते.

'संत मुंगशुजी : एक कृतिशील तपस्वी' या चरित्रग्रंथात संत मुंगशुजींनी केलेल्या आदिवासी समाजाच्या उत्थानाचे कार्य प्रा. तुमरामांनी विशद केलेले आहे. त्यांचा जन्म चंद्रपूर जिल्ह्यातील कनेरी (पारडी) येथे गरीब आदिवासी कुटुंबात झाला. त्यांचा जन्मकाळ निश्चित नसला, तरी श्री. हरिदास पेंदामांनी 'मुंगशु बोवाचा पोवाडा' या अप्रकाशित काव्यरचनेत १५ जानेवारी १९०३च्या दरम्यान संत मुंगशुजींचा जन्म झाला असावा, असे मत नोंदवले आहे. देशभक्ती आणि सत्संगाचा लहानपणापासून ध्यास असल्यामुळे गावात एखादा साधू-महात्मा आला, की त्याचा उपदेश ऐकण्यासाठी ते आवर्जून जायचे. संतांचे अभंग गोड आवाजात म्हणून दाखविण्यात त्यांना धन्यता वाटे. प्लेग, कॉलऱ्याच्या महामारीत गाव सापडल्यामुळे ते पोटाची खळगी भरण्यासाठी मिळेल ते काम करून चिहेगावला राहू लागले. संतांचे साहित्य विकत घेऊन लोकप्रबोधन आणि समाजजागृतीसाठी त्यांनी काव्यप्रपंच थाटला. परिणामी शेतकरी, शेतमजूर, महिला आणि तळागाळातील माणूसही त्यांच्या काव्याचा विषय बनून अवतरला. आदिवासींच्या उज्ज्वल इतिहासाचे त्यांनी आपल्या पोवाड्यात

'आदिवासी बंधूंचा लढा।
गातो पोवाडा, जीवाचा धडा लढाईचा।
इतिहास आपल्या पूर्वजांचा।
आदिवासी गोंड लोकांचा।
पहा त्या शूर बहादुरांचा रं जी जी ऽऽ।।'

असे म्हणत बाबुराव शेडमाके, वीरांगना महाराणी दुर्गावतीसारख्या आदिवासी वीरांचा गौरव केला आहे. असा हा आदिवासीच्या पोटी जन्माला आलेला संतकवी २४ फेब्रुवारी १९७२ ला काळाआड गेला. अशा प्रकारे आदिवासी क्रांतिकारक, वीरांची चरित्रे आदिवासी साहित्याला गतिमानता देणारी ठरतात.

**आधारभूत संदर्भग्रंथ :–**


१) व्यंकटेश आत्राम – "दोन क्रांतिवीर", सेवा प्रकाशन, अमरावती, १९६८.
२) डॉ. गोविंद गारे – "आदिवासी वीरपुरुष", श्रीविद्या प्रकाशन, पुणे, १९८६.
३) डॉ. गोविंद गारे – "महाराष्ट्रातील आदिवासी जमाती", कॉन्टिनेंटल प्रकाशन, पुणे, २०००.
४) डॉ. गोविंद गारे – "ठक्करबाप्पा", श्रीविद्या प्रकाशन, पुणे, १९८७.
५) डॉ. विनायक तुमराम – "गोंडवनातील क्रांतिवीर नारायणसिंह उईके", प्रॉम्प्ट सर्व्हिस, सांगली, १९८६.
६) डॉ. विनायक तुमराम – "धरतीआबा : जनचेतनेचे विद्रोही रूप", हरिवंश प्रकाशन, चंद्रपूर, १९९९.
७) डॉ. विनायक तुमराम – "संत मुंगशुजी : एक कृतिशील तपस्वी", हरिवंश प्रकाशन, चंद्रपूर, १९९९.
८) वसंत पाटील – "हुतात्मा नाग्या कातकरी", वनवासी कल्याण आश्रम प्रकाशन, ठाणे, १९९९.
९) डॉ. गोविंद गारे – "सातपुड्यातील भिल्ल", अमृत प्रकाशन, औरंगाबाद, १९९७.
१०) डॉ. शैलजा देवगावकर – "वैदर्भीय आदिवासी :









जीवन आणि संस्कृती", मंगेश प्रकाशन, नागपूर, १९८९.
११) डॉ. सुदाम जाधव – "सातपुड्यातील आदिवासी", सुलबा प्रकाशन, औरंगाबाद, १९८४.
१२) पुरुषोत्तम सेडमाके – "वणसूर्य", गोंडवाना साहित्य प्रसार प्रकाशन, भंद्रावती, १९९१.
१३) गुलाबसिंग वसावे – "स्वातंत्र्य लढ्यात वनवासींचे योगदान", भारतीय विचार साधना प्रकाशन, पुणे, २००३.
१४) गो. नि. दांडेकर – "भिल्लवीर कलिंग", मृण्मयी प्रकाशन, पुणे, तृतीयावृत्ती २००२.
१५) डॉ. माहेश्वरी गावित – "महाराष्ट्रातील आदिवासी मराठी साहित्य : एक शोध", दास्ताने रामचंद्र कंपनी, पुणे, २००८.





अनुक्रमणिका

# डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे देश-विकासातील योगदान

प्रा. कुचेकर एच.एस

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी आपल्या संपूर्ण आयुष्यामध्ये खडतर परिश्रम घेऊन प्रत्येक क्षेत्रात उल्लेखनीय असे कार्य केले आहे. मग त्यांनी दिलेला मानवाधिकाराचा लढा असो की राजकीय, आर्थिक, धार्मिक स्वरूपाचा लढा असो. त्यांच्या प्रत्येक लढ्याला देशाच्या इतिहासामध्ये अनन्यसाधारण महत्त्व आहे. डॉ. बाबासाहेबांनी आपल्या देशासाठी स्वतःचे रक्त आटवून निस्सीम त्याग करून आदर्श भारतीय संविधान निर्मितीचे कार्य केले, हे साऱ्या भारतवासीयांना माहीत आहे. तसेच भारत स्वातंत्र्यप्राप्तीच्या वाटेवर असताना (१९४२-१९४६) देशाचा विकास आणि उद्धार होण्यासाठी देशाचे प्लॅनिंग कसे असावे, याचे नियोजन डॉ. बाबासाहेबांच्या आधिपत्याखाली झाले होते. इंग्रजांच्या साम्राज्यात जाऊन त्यांच्या साम्राज्याविरुद्ध बोलण्याचे साहस बाबासाहेबांनी दाखविले. भारतीयांना न्याय्य हक्क देण्यास आणि जबाबदार शासनपद्धती देण्याची तयारी नसेल, तर इंग्रजांनी भारत देश सोडून निघून जावे, असे गोलमेज परिषदेत स्पष्ट व निर्भीडपणे इंग्रजांना सुनावणारे डॉ. बाबासाहेब आंबेडकर पहिले एकमेव प्रतिनिधी होते. बाबासाहेबांनी धर्मांतर करतानासुद्धा भारताच्या संस्कृतीचा, भारताच्या एकात्मतेचा विचार करूनच भारतभूमीत जन्मलेला भारताचा मूळ धम्मच स्वीकारला आहे. ते नेहमी म्हणत, "प्रथम मी भारतीय आहे आणि शेवटीही भारतीयच आहे. म्हणूनच बाबासाहेबांनी भारतीयांना अमर संदेश दिला की, देशाच्या स्वातंत्र्यासाठी शरीरात रक्ताचा शेवटचा थेंब असेपर्यंत आपण प्राणपणाने लढले पाहिजे."

तरीही इथल्या व्यवस्थेने बाबासाहेबांना अस्पृश्योद्धारक, हिंदूविरोधी, इंग्रजांचे हस्तक, काँग्रेस-विरोधी एवढ्यापुरतेच मर्यादित करून टाकले होते. मात्र बाबासाहेबांचे वृत्तपत्रीय लेखन, त्यांची ग्रंथसंपदा, भाषणे, त्यांची पत्रे यांचा अभ्यास करता असे दिसते, की त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचा संपूर्ण अभ्यास मांडला जात नाही. तो जर मांडला तर असे दिसते की, भारताच्या जडण-घडणीमध्ये, उभारणीमध्ये गांधी-नेहरू-पटेलांएवढेच महत्त्वपूर्ण योगदान डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे आहे.

डॉ. बाबासाहेबांनी संसदीय लोकशाहीच्या निकोप वाढीसाठी जातिभेद, वर्णभेद, वर्गभेद, उच्चनीच, गरीब-श्रीमंत असे भेदभाव नष्ट करण्याचे महत्त्वाचे कार्य केले. त्याशिवाय चातुर्वर्ण्य समाजव्यवस्थेमुळे जो अस्पृश्य समाज गुलामगिरीचे, अन्याय, अत्याचार आणि अपमानाचे जीवन जगत होता, त्याला संविधानाद्वारे मूठमाती देऊन सर्वांसाठी समता प्रस्थापित करून संविधानात 'एक व्यक्ती, एक मत, एक मूल्य' हे अत्यंत महत्त्वपूर्ण तत्त्व अंतर्भूत केले आणि विविधतेत एकता निर्माण करून राष्ट्रीय एकात्मता साधली. यामुळेच आज विविध जाती, धर्मसंप्रदाय, पंथ असूनसुद्धा भारत देश मजबूत व एकसंध आहे.

सर्व प्रकारच्या प्रज्ञानाचे मूळ अज्ञानामध्ये आहे, हे ओळखून म. फुले यांनी म्हटल्याप्रमाणे, 'विद्येविना मती गेली, मतीविना नीती गेली, नीतीविना गती गेली, गतीविना वित्त गेले एवढे अनर्थ एका अविद्येने केले.' म्हणून डॉ. बाबासाहेब म्हणतात, "शिक्षण हे वाघिणीचे दूध आहे. ते दूध जो कुणी प्राशन करेल, तो गुरगुरल्या-शिवाय राहणार नाही."

यासाठी त्यांनी शैक्षणिक संस्था, महाविद्यालये निर्माण करून बहुजन समाजासाठी शिक्षण मोफत मिळेल, अशी व्यवस्था केली आणि शिक्षणाच्या रूपाने वाघिणीचे दूध आणि कायद्याच्या रूपाने सोन्याचे पात्र बाबासाहेबांनी समाजाला मिळवून दिले. हे त्यांचे शैक्षणिक योगदान विसरता येणार नाही. तसेच सामाजिक क्षेत्रात डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे फार मोठे योगदान आहे. या देशाच्या इतिहासाची पाने चाळली, तर आपल्याला पावलोपावली समाजसुधारक दिसतील. या देशामध्ये सम्राट अशोकापासून संत कबीर ते संत गाडगेमहाराजांपर्यंत

व म. फुले, शाहूमहाराज, डॉ. आंबेडकर इथपर्यंत समाजसुधारक झाले. बाबासाहेबांनी जातीयता, वंशभेद, वर्णभेद, उच्चनीचता या भयानक आजाराने ग्रासलेल्या दीनदुबळ्या पिछडलेल्या अस्पृश्य समाजाला मनोधैर्य दिले.

भारतात संघराज्य शासन पद्धती स्वीकारण्यात आलेली असताना डॉ. बाबासाहेबांनी भारतीय संविधानात केंद्राला जास्त आणि राज्याला कमी अधिकार देऊन मजबूत केंद्र सरकारचे समर्थन केले. हे प्रखर राष्ट्रवादाचे द्योतक मानले जाते. भारताला मजबूत केंद्र सरकारची का आवश्यकता आहे, हे बाबासाहेबांनी पटवून दिले आहे. बाबासाहेब म्हणतात, अलेक्झांडर डॅरियस, सॅरिअस, मोहम्मद बिन कासीम, मोहम्मद घोरी, चंगेजखान, तैमूरलंग, बाबर इ. च्या आक्रमणासमोर भारताला पराभव पत्करावा लागला; याचे मूळ कारण म्हणजे, भारतात भारताकरिता लढणारी आणि एकसंध नेतृत्व देणारी केंद्रीय सत्ता नव्हती. केंद्र सरकार मजबूत केल्यामुळेच पाक व चीन यांच्या आक्रमणाला भारत यशस्वी तोंड देऊ शकला, हे बाबासाहेबांच्या कार्याचे मोठेपण आहे.

देशातील सर्वच वर्गांना मतदानाचा अधिकार मिळाला पाहिजे, म्हणून "एक व्यक्ती, एक मत, एक मूल्य" हे तत्त्व स्वीकारण्यात आले. पुरुषांबरोबरच स्त्रियांनाही मतदानाचा अधिकार मिळाला पाहिजे, यासाठी भारतीय राज्यघटनेने प्रौढ मताधिकाराचे तत्त्व स्वीकारून फार मोठी कामगिरी केली. कारण पाश्चिमात्य देशांत आणि अमेरिकेतसुद्धा स्त्रियांना मतदानाचा अधिकार खूप उशिरा मिळाला. परंतु दलितांच्या, अस्पृश्यांच्या हितसंरक्षणाकरिता संविधानसभेत गेलेल्या बाबासाहेबांनी महिलांसकट सर्वांना मतदानाचा अधिकार मिळाला पाहिजे, याकरिता आवाज उठविला आणि तो हक्क मिळविला, हे त्यांचे खरोखरच मोठे देशहिताचे कार्य होते.

हिंदू कोड बिल हे बाबासाहेबांनी स्त्रियांच्या उत्थानाच्या दृष्टीने टाकलेले एक महत्त्वाचे राष्ट्रीय पाऊल होते. परंतु काँग्रेस पक्ष व सनातनी प्रवृत्तीच्या लोकांनी या बिलास विरोध केला. या बिलामुळे स्त्रियांना सामाजिक प्रतिष्ठा, संपत्तीत वाटा, घटस्फोट इ. बाबतींत स्वातंत्र्य मिळणार होते. मात्र जरी हे बिल नाकारले गेले, तरी १९५५-५६ ला पं. नेहरूंनी या बिलावर आधारितच स्त्रियांच्या हक्कांचे संरक्षण करण्याच्या दृष्टीने महत्त्वाचे कायदे केले, हे बाबासाहेबांच्या प्रयत्नाचे यश आहे.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी राष्ट्रबांधणीच्या कार्यात अतिशय महत्त्वाच्या सूचना केल्या. यात बाबासाहेबांनी हिल्टन यंग कमिशनसमोर रिझर्व्ह बँक ऑफ इंडियाच्या स्थापनेबाबत भूमिका मांडली होती. तसेच करव्यवस्थेबाबत ते म्हणतात, की करआकारणी करताना वैयक्तिक कर हा व्यक्तीच्या करपात्र क्षमतेवर करावा. तो एकूण ढोबळ उत्पन्नावर आकारू नये. श्रीमंतावर अधिक तर गरिबावर कमी कर आकारावा. काही मर्यादेपर्यंत करदात्यांना करसवलत असली पाहिजे. सगळ्यात महत्त्वाचे म्हणजे लोकांच्या राहणीमानाचा दर्जा खालावेल, अशी करप्रणाली असू नये. तसेच व्हॉइसरॉय जनरलच्या कौन्सिलचे सदस्य म्हणून काम करताना ७ मे १९४३ ला स्टँडिग लेबर कमिटी स्थापन करण्याच्या दृष्टीने एक कॉन्फरन्स आयोजित केली. त्यामध्ये इंग्लंड-अमेरिकेच्या धर्तीवर जॉ लेबर मॅनेजमेंट कमिटी स्थापन करण्याच्या निर्णयाबरोबरच एम्प्लॉयमेंट एक्सचेंज स्थापन करण्याचा निर्णय त्यांनी घेतला. त्याद्वारे कुशल, अकुशल कामगारांना रोजगार मिळण्याच्या दृष्टीने काम करण्याचे ठरले. त्यासाठी मजुरी दर, अन्नदर्जा, कपडे, घर, शिक्षण आरोग्य इ. मुद्द्यांवर सर्व्हे घेण्याचे आदेश दिले.

व्हॉईसरॉय मंत्रिमंडळात कामगार खात्याचा मंत्री म्हणून बाबासाहेबांनी कामगार आणि मालक या दोघांच्याही हिताचे समतोल धोरण राबविले. कामगारविषयक वाद मिटवण्यासाठी त्रिपक्षीय मजूर न्यायाधिकरणाची शिफारस करून कामगार युनियन असल्या पाहिजेत, असे ठाम मत मांडले. गरोदर कामगार महिलांना बाळंतपणासाठी पूर्णवेळ पगारी रजा देण्याचे धोरण राबविले. तसेच स्त्रीकामगारासाठी कलम ३९ (९) नुसार पगारदार पुरुषाइतकाच पगार त्याच पदावर काम करणाऱ्या स्त्रियांनाही मिळावा, अशी घटनेत तरतूद केली. भारतात अशा प्रकारचे क्रांतिकारी धोरण राबविणारे डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे पहिले कामगारमंत्री होते.

१९४२ मध्ये व्हॉईसरॉयच्या मंत्रिमंडळात असताना डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी सेंटर वॉटरवेज इरिगेशन

ॲण्ड नेव्हिगेशन कमिशन व सेंट्रल टेक्निकल पॉवर बोर्ड अशा समित्या स्थापन करण्याचा निर्णय घेतला. यातूनच आताच्या केंद्रीय जल आयोग व केंद्रीय विद्युत-आयोग यांची निर्मिती झाली. येत्या काळात भारताला मोठ्या प्रमाणात विजेची गरज लागणार आहे. त्याबाबत निर्मिती-नियोजन करणे, स्वस्त दरात वीज उपलब्ध करणे, राज्य व केंद्र सरकार यांच्यात चर्चा होणे इत्यादींबाबत केंद्रीय पातळीवर नियामक समिती असावी, असा विचार डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी मांडला व त्यातून सें.टे.पॉ.बो. (सीटीपीबी) स्थापन झाले. त्यातूनच पुढे १९४८ मध्ये केंद्रीय विद्युत् कायदा (सीईए ॲक्ट १९४८) झाला. त्या कायद्याद्वारे विद्युत्‌निर्मिती, वहन, वितरण व त्याबाबतच्या सर्व बाबींवर नियंत्रण ठेवले जाते. त्यातूनच पुढे भारतातील विद्युत् विकासाबाबत २५ ऑक्टो. १९४३ रोजी डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या अध्यक्षतेखाली रिकंस्ट्रकशन पॉलिसी ऑन पब्लिक वर्क्स ॲण्ड इलेक्ट्रिसिटीची बैठक झाली. त्या कमिटीचे बाबासाहेब चेअरमन होते. त्या मीटिंगला केंद्र, प्रांतिक सरकारे व व्हॉईसरॉयचे प्रतिनिधी हजर होते. त्यातून आधुनिक नॅशनल पॉवरग्रीडची कल्पना तयार झाली.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी सार्वजनिक बांधकाम खात्याचा मंत्री म्हणून तीन महत्त्वाच्या योजना राबविण्याचा संस्मरणीय प्रयत्न केला आहे. त्यात

१. प्रथम त्यांनी भारतात उत्कृष्ट विमानतळांच्या उभारणीचा कौतुकास्पद प्रयत्न केला.

२. दामोदर नदीच्या खोऱ्यात उत्तम धरणांची निर्मिती करण्याचा यशस्वी प्रयत्न केला.

३. त्यांनी भारतातून दुष्काळाचे संकट कायमचे दूर करण्याच्या उद्देशाने उत्तर भारतातील मोठ्या नद्या दक्षिण भारतातील नद्यांशी जोडण्याची योजना तयार केली होती.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी नद्यांच्या बहुउद्देशीय विकासाचा फॉर्म्युला मांडला. दामोदर खोरे प्रकल्प हा बहुराज्यीय, बहुउद्देशीय प्रकल्प गतिमान करण्यात त्यांची महत्त्वाची भूमिका होती. तसेच भाक्रा नानगल प्रकल्प जरी १९०८ पासून सुरू करण्याच्या दृष्टीने पावले टाकली गेली असली, तरी १९४२-४६ च्या दरम्यान डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी व्हॉईसरॉय कौन्सिलमध्ये मजूर, विद्युत्, इरिगेशन मंत्री म्हणून त्याला पूर्णत्वाच्या टप्प्यावर नेले. सोन नदी प्रकल्प, तुंगभद्र प्रकल्प, कोयना, नागार्जुन सागर, श्रीशैलम, अप्पर कृष्णा, राणाप्रताप सागर इ. सारखे प्रकल्प हे बाबासाहेबांच्या बहुउद्देशीय नदी विकास प्रकल्प योजनेवर आधारित उभे राहिले आहेत. त्यातून देशभरात साधारण ९५ लाख हेक्टर जमिनीला पाणी, २५००० एम. डब्ल्यू. जलविद्युत् क्षमता, लाखो लोकांना पिण्याचे पाणी उपलब्ध झाले. तसेच कृष्णा, गोदावरी, तापी नद्यांच्या पात्रांतील पाणी समुद्रात मिसळून वाया जाऊ नये, यासाठी बाबासाहेबांनी या नद्यांच्या जोडणीची शिफारस केली. तोच नदीजोड प्रकल्प. अर्थात त्यांच्या मजूरमंत्रिपदाच्या काळात हे काम प्रत्यक्ष सुरू जरी झाले नसले, तरी त्याबाबतचे चिंतन, सूचना व योजना मात्र त्यांनी सुचविल्या. त्याचीच परिणती म्हणजे सरदार सरोवराच्या नवगाव कॅनॉलची निर्मिती होय.

परराष्ट्र धोरणाबाबतही बाबासाहेबांची भूमिका अधिक स्पष्ट होती. १९५४ मध्ये पं. नेहरूंच्या हिंदी-चिनी भाई-भाई या घोषणेला ते विरोध करतात व चीनच्या सामरिक व्यूहरचनेबाबत सतर्कतेचा इशारा देतात. पण त्यांच्या त्या इशाऱ्याकडे केंद्र सरकारने लक्ष न दिल्यामुळे १९६२चे भारत-चीन युद्ध झाले. त्यात चीनने जवळजवळ ९० हजार स्क्वेअर मैल प्रदेश आपल्या कब्जात घेतला. जगामध्ये भारत असा एकमेव देश आहे, की त्याच्या भोवती दोन आण्विक राष्ट्रे आहेत. या दोन्ही राष्ट्रांबाबत परराष्ट्र व संरक्षण धोरण कसे असावे, याबाबत बाबासाहेब चर्चा करताना दिसतात.

काश्मिर प्रश्नाबाबतही डॉ. बाबासाहेबांनी अतिशय व्यापक भूमिका घेतली होती. ते म्हणतात, की एखाद्या समूहास आपण जबरदस्तीने सामील करून घेऊ शकत नाही. म्हणून बाबासाहेबांनी लोकसंख्यास्थलांतर व काश्मिरची फाळणी तीन विभागांत करून काही ठिकाणी जनमत घेऊन तो प्रश्न कायमचा निकालात काढावा, असा सिद्धान्त मांडला होता. परंतु दुर्दैवाने तसे झाले नाही. कारण तसे झाले असते, तर देशात आज हिंदू-मुस्लिम विषयावर राजकीय मंडळींना राजकारण करता आले नसते; म्हणून जाणीवपूर्वक बाबासाहेबांच्या

अनुक्रमणिका

भूमिकेकडे दुर्लक्ष केले. मात्र जगाच्या पाठीवर हा प्रश्न इतका संवेदनशील होऊन बसला आहे, की दोन्ही राष्ट्रांकडे असलेल्या आण्विक शक्तीमुळे या प्रश्नांकडे दोन्ही राष्ट्रे संशयाने पाहतात. त्यामुळे डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी केलेले भाकित खरे ठरले आहे.

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे कृषिविषयक धोरण देशाला आणि शेतकऱ्याला आर्थिक दृष्ट्या सक्षम करणारे होते, हे आपणास त्यांनी २५००० शेतकऱ्यांचा मोर्चा घेऊन १० जानेवारी १९३८ रोजी त्या वेळचे मुख्यमंत्री ना. खेर यांना सादर केलेल्या निवेदनावरून दिसून येते. त्या निवेदनात त्यांनी ज्या मूलभूत मागण्या केल्या होत्या, त्यात जमिनीची प्रत्यक्ष मशागत करणाऱ्यालाच त्याच्या मेहनतीचे फळ मिळाले पाहिजे; जमीन कसणाऱ्या शेतकऱ्यावर करपट्टी बसविण्यापूर्वी त्याला चरितार्थापुरती योग्य ती सोय करून देणे हे सरकारने आपले कर्तव्य मानले पाहिजे; त्याचप्रमाणे पाणी, विद्युत् यांचा पुरवठा समतोल असेल, तर ग्रामीण भारत संपन्न होईल; त्याचे वितरण कसे करायचे याविषयीचे जे विचार डॉ. बाबासाहेबांनी दामोदर नदी पूरचौकशी कमिटीसमोर मांडले, ते शेतकऱ्यांच्या विकासास व शेतीविकासास किती मौलिक होते, हे समजते.

**सारांश –**

आज जगातील बौद्ध राष्ट्रांत डॉ. बाबासाहेब आंबेडकरांना अतिशय सन्मानाचे स्थान आहे. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी भारतातील दलित, शोषित, पीडित समाजाच्या उत्थानासाठी केलेला संघर्ष हा विविध देशांतील शोषित-पीडित जनतेच्या उत्थानाच्या दृष्टीने जगाला प्रेरक ठरला आहे. त्यांचे विचार आणि कार्य हे देशाला आणि जगाला सर्वांगीण विकासाच्या मार्गावर घेऊन जाणारे आहे, याची जाणीव आज जगातील अनेक अभ्यासकांना होऊ लागली आहे. आजपर्यंत भारतीय नेत्यांनी डॉ. बाबासाहेब आंबेडकरांची ओळख जगाला होऊ दिली नाही. परंतु त्यांच्या विचार आणि कर्तृत्वामुळे त्यांची जगाला ओळख झाली आहे. इतकेच नव्हे, तर पुढील काही वर्षांत जगातील तरुणांचे आदर्श हे केवळ डॉ. बाबासाहेब आंबेडकर राहतील. ही केवळ कल्पना नाही तर वास्तविकता आहे.

सर्व गोष्टींचा विचार केल्यास बाबासाहेब एकाच वेळेस किती पातळ्यांवर काम करीत होते, याचा विचार आपण करू शकतो. एकीकडे ७ कोटी बहिष्कृत समाजाचा विकास व दुसरीकडे सनदशीर मार्गाद्वारे राज्यघटनेत विविध तरतुदी करून राष्ट्राच्या मुख्य प्रवाहात दलित, आदिवासी, बहुजन यांना आणण्याचा प्रयत्न करताना ते दिसतात.

**संदर्भ ग्रंथ –**


१. सुखदेव थोरात, अनुवाद- प्रा. रमेश दांडगे, प्रा. विजय काकडे, प्रा. चंद्रकांत भानुमते, डॉ. बाबासाहेब आंबेडकर : नियोजन, जल व विद्युत विकास भूमिका व योगदान; सुगावा प्रकाशन, पुणे, नोव्हें. २००५.

२. डॉ. बाबासाहेब आंबेडकर गौरव ग्रंथ –प्रचार प्रकाशन, कोल्हापूर, १९९१.

३. डॉ. बाबासाहेब आंबेडकर जयंती विशेषांक – प्रकाशक, बृहन्मुंबई महानगरपालिका, एप्रिल २००७.

४. डॉ. बाबासाहेब आंबेडकर गौरव ग्रंथ – प्रकाशक, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई २००६.

५. डॉ. सी. एच. निकुंभे – डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचा राष्ट्रवाद : वास्तव आणि विपर्यास, सुगावा प्रकाशन, पुणे, जुलै २००८.




## लेखकांचा परिचय

❖ **श्री. शिं. ना. माने**

अर्थशास्त्राचे निवृत्त शिक्षक. अर्थशास्त्रविषयक वाचन-स्वाध्ययन-लेखन आजपर्यंत सुरू.
***पत्ता :-*** १२, "दर्शन", सहयोग गृहनिर्माण संस्था, गोरखपूर, सातारा - ४१५००३.

❖ **प्रा. डॉ. गोमटेश्वर पाटील**

'विसाव्या शतकातील कादंबरीची समीक्षा' या विषयावर पी.एच.डी., विलास सारंग यांच्या कथांचा अभ्यास. अर्वाचीन मराठी जैन साहित्य (१८५०-२०००) या मेजर प्रोजेक्टवर अभ्यास सुरू.
***पत्ता :-*** सहायक प्राध्यापक, महावीर महाविद्यालय, कोल्हापूर - ४१६१०१. भ्रमणध्वनी : ९८५०७५८२०७

❖ **प्रा. डॉ. अविनाश आवलगावकर**

पुणे विद्यापीठाच्या मराठी विभागात प्राध्यापक म्हणून कार्यरत. मध्ययुगीन व विशेषतः महानुभाव साहित्य याविषयी लेखन. अनुष्टुभ्, युगवाणी, अस्मितादर्श, मराठी संशोधन पत्रिका, महाराष्ट्र साहित्य पत्रिका इत्यादींमधून संशोधन व समीक्षात्मक लेखन प्रकाशित.
***पत्ता :-*** १०४, सँडलवूड, स्पेन्सर्स लेन, डी.पी. रोड, औंध, पुणे - ४११००७.दूरध्वनी : (०२०) २५८९६१५४

❖ **प्रा. डॉ. पंडितराव शा. पवार**

गेली चाळीस वर्षे उच्चशिक्षण क्षेत्रात कार्यरत आहेत.
***पत्ता :-*** ६ , ऋषिराज पार्क, अरिहंत नर्सिंग होमजवळ, मधुकमल नगर, गंगापूर रोड, नाशिक - ४२२०१३.
दूरध्वनी : (०२५३) २३४३७८७, भ्रमणध्वनी : ९४२३१८१०८७.

❖ **प्रा. डॉ. भगवान माने**

फ्रीलान्स जर्नालिस्ट, योजना मासिक (भारतसरकार), सुगावा (पुणे), अस्मितादर्श (औरंगाबाद), विचारमंथन, प्रबोधन प्रकाशन ज्योती (इचलकरंजी) इत्यादी मासिकांमधून लेख प्रसिद्ध. राज्य व राष्ट्रीय स्तरावर शोधनिबंध-वाचन, भारतीय संविधानाचा विशेष अभ्यास. महाराष्ट्र राज्य राज्यशास्त्र व लोकप्रशासन परिषदेचे कार्यकारिणीसदस्य
***पत्ता :*** असोसिएट प्रोफेसर, राज्यशास्त्र विभागप्रमुख, जयसिंगपूर कॉलेज, जयसिंगपूर, ता. शिरोळ,
जि. कोल्हापूर.- ४१६१०१. भ्रमणध्वनी : ९८२३८४५१४१.

❖ **प्रा. डॉ. अनंता सूर**

मराठी विभागप्रमुख श्री गजानन महाराज महाविद्यालय, मुकुटबन, ता. झरी, जि. यवतमाळ - ४४५३१९
***पत्ता :-*** मराठी विभागप्रमुख, श्री गजानन महाराज महाविद्यालय, मुकुटबन, ता. झरी,
जि. यवतमाळ - ४४५३१९. भ्रमणध्वनी : ९४२१७७५४८८

❖ **प्रा. एच. एस. कुचेकर**

भारतीय राज्यघटनेवर वेगवेगळ्या विषयांस अनुसरून लेख प्रकाशित.आंबेडकरी चळवळीवरील लेख वेगवेगळ्या मासिकांमध्ये प्रकाशित.
***पत्ता :-*** राज्यशास्त्र विभाग, कला आणि वाणिज्य महाविद्यालय, नेसरी, ता. गडहिंग्लज,
जि. कोल्हापूर - ४१६१०१. भ्रमणध्वनी : ९९२२३४६८४४

# लेखकांस आवाहन

'नवभारत' मासिकामध्ये दर्जेदार वैचारिक लेखनाचे आम्ही नेहमीच स्वागत करतो. पण 'नवभारता' कडे आपले लेखन पाठविण्यापूर्वी काही काळजी घ्यावी, अशी विनंती आहे.

१. आपले लेखन सुवाच्य अक्षरात कागदाच्या एकाच बाजूस असावे.

२. आपण लेखनासाठी जे संदर्भ वापरले असतील, ते लेखाच्या शेवटी काही टीपा असल्यास त्यांसह द्यावेत.

३. महत्त्वाचे म्हणजे आपण आपला लेख यापूर्वी कुठल्याही नियतकालिकात प्रसिद्धीसाठी पाठविलेला नाही, याची स्पष्ट कल्पना 'नवभारत' च्या संपादकांना द्यावी.

४. 'नवभारत' मध्ये लेख छापण्यापूर्वी तो संपादक मंडळाच्या योग्य त्या सदस्याकडे वाचनासाठी व अभिप्रायासाठी पाठविला जातो. त्यामुळे तो लेख कुठल्या महिन्यात 'नवभारत' मध्ये येईल किंवा येणार नाही, हे यथावकाश कळविले जाईल, याची लेखकांनी कृपया नोंद घ्यावी. आपल्या सहकार्याबद्दल संपादक मंडळ आपले आभारी आहे.

– संपादक मंडळ

अनुक्रमणिका

हे मासिक घ. वा. जोशी यांनी सन प्रिंटर्स, गणपती आळी, वाई, पिन : ४१२८०३ येथे छापून सरोजा भाटे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.

अनुक्रमणिका

# नवभारतास

# हार्दिक

# शुभेच्छा !

**– पु.ना. गाडगीळ आणि कंपनी यांच्याकडून**

हे मासिक घ. वा. जोशी यांनी सन प्रिंटर्स, गणपती आळी, वाई, पिन : ४१२८०३ येथे छापून सरोजा भाटे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.

अनुक्रमणिका






